सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०२१
**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रतिक्षायादीतून शिफारस केलेल्या उमेदवारांचे मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांक : एएससी १४२२/प्र.क्र.२३०/१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक : ०२२-२२७९४१७२.
दिनांक : ३१ मे, २०२३.

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. मलोआ २०१७/प्र.क्र.१२६/१४-अ, दि. २१-०८-२०१७.
२) या विभागाचे समक्रमांकाचे ज्ञापन दिनांक २३-०१-२०२३.
३) या विभागाचे समक्रमांकाचे दि. ३१-०३-२०२३ रोजीचे पत्र.
४) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. १४४२ (२)(१)/२०२१/तेवीस, दि. १७-०५-२०२३.

ज्ञापन :-

महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित गट-ब मुख्य परीक्षा-२०२१ या परीक्षेतील सहायक कक्ष अधिकारी संवर्गाच्या १०० पदांसाठी दिनांक ३१-०७-२०२२ रोजी घेण्यात आलेल्या मुख्य परिक्षेचा अंतिम निकाल दि. ०६-१२-२०२२ रोजी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केला आहे. सदर निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या १०० उमेदवारांचे संदर्भाधीन क्र. २ येथील ज्ञापनान्वये मंत्रालयीन विभागात नियतवाटप करण्यात आले होते. सदर ज्ञापनान्वये नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवारांपैकी रूजू न झालेल्या उमेदवारांच्याऐवजी संदर्भाधीन क्र. १ येथील शासन परिपत्रकातील तरतुदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ३१-०३-२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रतिक्षायादीतील उमेदवार उपलब्ध करून देण्याबाबत मागणी करण्यात आली. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. १७-०५-२०२३ रोजीच्या पत्रान्वये रूजू न झालेल्या प्रवर्गातील आरक्षित जागांसाठी प्रतिक्षायादीतील २९ उमेदवार उपलब्ध करून दिले आहेत. त्यानुसार सोबतच्या **विवरणपत्र "अ"** मधील उमेदवारांचे त्यांच्या नावांसमोर दर्शविलेल्या मंत्रालयीन विभागात सहायक कक्ष अधिकारी या पदावर नियतवाटप करण्यात येत आहे.

२. सोबतच्या विवरणपत्र “अ” मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांची नेमणूक पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात करण्यात यावी :-

(१) सदर विवरणपत्रातील सर्व उमेदवारांनी **दिनांक ३०-०६-२०२३ पर्यंत** संबंधित विभाग/कार्यालयात व्यक्तिश: उपस्थित राहून अस्थायी नियुक्तीचा स्वीकार करणे आवश्यक आहे. **सदरहू कालावधीत उमेदवारांनी अस्थायी नियुक्ती स्विकारली नाही तर त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता, या विभागाच्या/महाराष्ट्र लोकसेवा**

**आयोगाच्या निवडसूचीतून कमी करण्यात येईल**. तसेच विहित कालावधीत नियुक्ती स्वीकारणाऱ्या उमेदवारांची ज्येष्ठता महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम, २०२१ मधील तरतूदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि. १७-०५-२०२३ च्या पत्रान्वये केलेल्या शिफारस क्रमांकानुसार राहिल. तसेच शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी. ६७/प्र.क्र.२०७/कार्या.१२, दिनांक २८-०५-२०१८ मधील तरतुदीनुसार **" सदर उमेदवारांची शिफारस ही प्रतिक्षायादीमधून झालेली असल्यामुळे, सदर उमेदवारांची ज्या आदेशान्वये नियुक्ती होईल, त्या आदेशानुसार ते ज्या दिनांकास रूजू होतील त्या दिनांकास त्यांची ज्येष्ठता निर्धारित केली जाईल. सदर उमेदवारांना मूळ गुणवत्ता यादीनुसार ज्येष्ठतेचे लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत."**

(२) लोकसेवा आयोगाकडे केलेल्या अर्जातील दाव्यांची तपासणी / पडताळणी आयोगाने केलेली नसल्याने, नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०२१ साठी देण्यात आलेल्या जाहिरात क्रमांक : ५१/२०२२, दिनांक ०२-०६-२०२२ मध्ये नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची दिनांक ०१-०२-२०२२ रोजीच्या अर्हतेनुसार तसेच शैक्षणिक आणि अन्य अटींची दिनांक १७-०६-२०२२ किंवा तत्पुर्वीच्या अर्हतेनुसार खाली नमूद केलेली मूळ प्रमाणपत्रे उमेदवारांनी सोबत घेऊन जावीत. नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना सदर प्रमाणपत्रांची साक्षांकित प्रत उमेदवाराजवळ असणे अत्यावश्यक आहे :-

(i) वयोमर्यादा (दिनांक ०१-०२-२०२२ रोजी)

(ii) अधिवास : मुख्य परीक्षेच्या जाहिरातीत नमूद केल्याप्रमाणे

(iii) शैक्षणिक अर्हता: सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा महाराष्ट्र शासनाने मान्य केलेली समतुल्य अर्हता मुख्य परीक्षेचा अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास किंवा तत्पूर्वी म्हणजेच दिनांक १७-०६-२०२२ किंवा तत्पूर्वी धारण करणे अत्यावश्यक आहे.

(iv) अंतर्वासिता (INTERNSHIP) निर्धारित केली असेल अशी पदवी धारण करणाऱ्या उमेदवारांनी अंतर्वासिता (INTERNSHIP) मुख्य परीक्षेचे अर्ज स्वीकारणाच्या दिनांकापर्यंत (दिनांक १७-०६-२०२२ किंवा तत्पुर्वी) पूर्ण केली असेल तरच त्याला पदवीधर समजण्यात येईल.

(v) प्रस्तुत परीक्षेची जाहिरात दिनांक २८-१०-२०२१ रोजी विज्ञापित केलेली आहे. वि.जा. (अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज. (ड), वि.मा.प्र., आ.दु.घ. व इ.मा.व. प्रवर्गाचा तसेच महिला वर्गवारीचा दावा केला असल्यास अशा उमेदवारांच्या बाबतीत शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक सीबीसी-२०१३/प्र.क्र.१८२/विजाभज-१, दिनांक १७ ऑगस्ट, २०१३ अन्वये जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याच्या नॉन क्रिमीलेयर प्रमाणपत्राचा कालावधी विचारात घेण्यात येईल.

(vi) प्रस्तुत मुख्य परीक्षेच्या जाहिरातीमधील परिच्छेद ५.५.४ नुसार मराठी ज्ञान आवश्यक आहे. सदर बाब संबंधित उमेदवारांच्या दहावीच्या गुणपत्रकाआधारे

किंवा महाविद्यालयाच्या प्राचार्य/विभाग प्रमुखांच्या प्रमाणपत्राआधारे तपासून घेण्यात यावी.

(vii) इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाच्या दि. ३१-०१-२०२० च्या शासन निर्णयानुसार खुल्या प्रवर्गातील महिला, विजाभज, इमाव व विमाप्रवर्गातील व्यक्ती, शैक्षणिक व सामाजिकदृष्टया मागासप्रवर्ग आणि या प्रवर्गात समाविष्ट मराठा समाज आणि आर्थिकदृष्टया दुर्बल प्रवर्ग या प्रवर्गातील प्रगत व उन्नत गटात समाविष्ट नसलेल्या व्यक्तिंना सक्षम प्राधिकारी यांनी निर्गमित केलेल्या NCL प्रमाणपत्राच्या वैधता पडताळणीसाठी राज्यातील प्रादेशिक महसूली विभाग स्तरावर "विभागीय आयुक्त" यांच्या अध्यक्षतेखाली NCL प्रमाणपत्र (उत्पन्नाच्या दाखल्याची) वैधता पडताळणी समिती गठीत करण्यात आली आहे. महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या महिला उमेदवारांचे तसेच अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांचे उन्नत व प्रगत गटात (क्रीमिलेयर) मोडत नसल्याचे सक्षम प्राधिकारीऱ्यांनी दिलेल्या NCL प्रमाणपत्राची वैधता संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी सदर समितीकडून उपरोक्त नमुद शासन निर्णयातील तरतुदीनुसार तपासून घेण्याची कार्यवाही करावी.

(viii) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०२२/ प्र.क्र.१६७/ १६-अ, दि. २१-११-२०२२ अन्वये एसईबीसी उमेदवारांना अनुज्ञेय करण्यात आलेला ईडब्युएस विकल्प ग्राह्य धरून, दि. ०९-०९-२०२० नंतर पूर्ण करण्यात आलेल्या निवड प्रक्रिया व उमेदवारांच्या वैध शिफारशीनुसार नियुक्त्यांना मान्यता देण्यात आलेली आहे. सदर मान्यता मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मा. उच्च न्यायालय येथे प्रलंबित याचिका तसेच मा. सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या विशेष अनुमती याचिका (डायरी) क्र. २९१७४/२०२२ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहतील असे नियुक्ती आदेशामध्ये नमूद करावे. तसेच त्याबाबत संबंधित उमेदवारांकडून बंधपत्र नियुक्ती प्राधिकाऱ्याने घ्यावे.

(३) उमेदवारांच्या पात्रता विषयक म्हणजेच शिक्षण, वय, खेळाडू, दिव्यांग, जाती विषयक प्रमाणपत्र, इत्यादीबाबतच्या मूळ प्रमाणपत्रांची पडताळणी आयोगाने तसेच या विभागाने केली नसल्यामुळे या सर्व बाबतीत नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी पडताळणी करणे आवश्यक आहे. प्रस्तुत उमेदवारांचे शिक्षण, वय, खेळाडू असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, शारीरिक अपंग असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, इत्यादीबाबतची मूळ प्रमाणपत्रेही अधिसूचनेत नमूद केलेल्या अर्हतेनुसार आहेत किंवा कसे? हे नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती करतानाच प्रथम तपासून पहावीत. आयोगाला केलेल्या अर्जातील दाव्याच्या तपासणीसाठी आवश्यक व योग्य ती प्रमाणपत्रे उमेदवार नियुक्ती प्राधिकाऱ्यांना सादर करु शकला नाही तर, उमेदवाराची नियुक्ती करण्यात येणार नाही

व उमेदवाराची शिफारस आपोआप रद्द समजण्यात येईल व तसे आयोगाला कळविण्यात येईल.

(४) दिव्यांगांसाठी राखीव असलेल्या पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची प्रमाणपत्रे वैद्यकीय मंडळाकडून तपासून घेण्याच्या अधीन राहून त्यांची शासनाकडे शिफारस करण्यात आलेली आहे. तसचे सा.प्र.वि, शा.नि. क्र अपंग १००३/प्र.क्र.१२७/ २००३/१६-अ, दिनांक ०६-०५-२००४ मधील बाब क्र. (६) नुसार त्यांच्या नेमणुकीपूर्वी उमेदवार संबंधित पदावर नियुक्तीसाठी सक्षम आहे किंवा नाही याची वैद्यकीय मंडळाकडून तपासणी केल्यानंतर ते नेमणुकीस पात्र ठरतील. दिव्यांगंसाठी राखीव असलेल्या पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रकि २०१२/प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दिनांक ६.१०.२०१२ मधील आदेशानुसार SADM या नवीन संगणक प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेले नवीन नमुन्यातील दिव्यांगतवाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रकि २०१८/प्र.क्र.४६/ आरोग्य-६, दिनांक १४.०९.२०१८ मधील आदेशानुसार केंद्र शासनाच्या www.swavlambancard.gov.in या संगणकीय प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेले नवीन नमुन्यातील किमान ४०% कायमस्वरुपी दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र शासनास नियुक्तीपूर्वी सादर करणे अनिवार्य राहील. तसेच दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ च्या आधारे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. दिव्यांग-२०१८/प्र.क्र.११४/१६-अ, दिनांक २९ मे, २०१९ तसेच या संदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार आरक्षणासंदर्भातील कार्यवाही करण्यात यावी. तसेच खाली नमूद करण्यात आलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांमधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात येईल :-

(अ) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : अपंग १००३/प्र.क्र.१२७/ २००३/१६-अ, दिनांक ६.५.२००४

(ब) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२००९/प्र.क्र.९/सुधार-३, दिनांक ३.८.२०१०

(क) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन परिपत्रक क्रमांक : अपंग २००९/प्र.क्र.१३३/सुधार-३, दिनांक १४.१.२०११

(ड) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रकि २०१२/ प्र.क्र.२९७/ आरोग्य-६, दिनांक ६.१०.२०१२

(५) ज्या मागासवर्गीय उमेदवारांची खुल्या प्रवर्गातील पदावर शिफारस करण्यात आली असेल त्या उमेदवारांबाबत सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीबीसी-१०/२००४/प्र.क्र.५७०/मावक-५, दिनांक १६.५.२००७ मधील सूचनेनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(६) (अ) मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांच्याबाबत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यासाठी व जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यास अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : बीसीसी-२०१२/प्र.क्र.३३२/१२/

१६-ब, दिनांक १८.५.२०१३ मध्ये नमूद सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी कार्यवाही करणे अपेक्षित असून, मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधिन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येईल. सदरहू उमेदवाराकडे जात पडताळणी समितीकडून प्राप्त करुन घेतलेले जाती वैधता प्रमाणपत्र असल्यास त्याने नियुक्तीसाठी हजर होताना ते सादर करावे. नसल्यास त्याने जाती प्रमाणपत्र पडताळणीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे/प्रमाणपत्रे नियुक्ती प्राधिकाऱ्यास तात्काळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

(ब) नियुक्ती प्राधिकाऱ्याने विनाविलंब सदर कागदपत्रे संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठवावी. याशिवाय संबंधित उमेदवाराने देखील स्वतंत्रपणे जात पडताळणी समितीकडे त्याच्याकडे असलेले कागदपत्रे/पुरावे सादर करुन पाठपुरावा करावा. जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. तसेच, शिफारस करण्यात आलेल्या सर्व उमेदवारांचे जाती दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांच्याकडून व जमातीचे दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून ते संबंधित समितीकडून निर्गमित करण्यात आल्याची खातरजमा करुन घेण्याची कार्यवाही देखील नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी.

(क) शिफारस करण्यात आलेल्या अनुसुचित जमातीच्या उमेदवारांचे दावे आयुक्त, आदिवासी विकास व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून तपासून घेण्याबाबत तसेच अन्य सर्व मागासवर्गीय उमेदवारांचे जाती/जमातीचे दावे नियुक्तीपूर्वी संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे यांचेकडून तपासून घेण्यात यावे.

(७) सहायक कक्ष अधिकारी पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.३.२००३ मधील तरतुदीनुसार (अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ०४.०२.२०१३ व शासन पूरकपत्र क्र.मातंसं २०१२/प्र.क्र.२७०/३९, दिनांक ०८.०१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. तथापि, नियुक्ती स्विकारण्याच्या वेळेस सदर प्रमाणपत्र/अर्हता उमेदवारांकडे नसल्यास नियुक्ती स्विकारल्यापासून दोन वर्षाच्या आत उमेदवाराने उपरोक्त शासन निर्णयातील नमूद संस्थेचे संगणक ज्ञानाच्या अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या विहित कालावधीत उमेदवाराने सदर प्रमाणपत्र सादर न केल्यास **शासन अधिसूचना**

क्र.एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.४६२/कार्या.१२, **दिनांक २८-०५-२०१८ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल ही बाब उमेदवाराच्या नियुक्ती आदेशात स्पष्टपणे नमूद करण्यात यावी.**

(८) हिंदी व मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर शिफारसप्राप्त उमेदवार अगोदर उपरोक्त नमुद परीक्षा उत्तीर्ण झाला नसेल किंवा त्याला सदरहू परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, सदरहू उमेदवारांना ती परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(९) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १३.०८.२०१४ तसेच अन्य अद्यावत शासन निर्णयामधील तरतूदीआधारे सदर सहायक कक्ष अधिकाऱ्यांची शिफारशी करण्यात येत आहेत. शासनाने यासंदर्भात वेळोवेळी केलेल्या सूचना विचारात घेता सहायक कक्ष अधिकाऱ्यांच्या पदाकरिता अमागास समांतर आरक्षित पदांसाठी शिफारसपात्र ठरलेले उमेदवार हे प्रत्यक्षात खुल्या (अराखीव) प्रवर्गातीलच उमेदवार आहेत याची त्यांच्या शाळा/ महाविद्यालय सोडल्याच्या दाखल्याआधारे तसेच अन्य तदनुषंगिक दस्तऐवजा आधारे नियुक्तीपूर्वी खात्री व पडताळणी करुनच त्यांना सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती देण्यात यावी.

(१०) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून प्रतिक्षायादीमधून शिफारसप्राप्त ठरलेल्या **२९ उमेदवारांनी** मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राच्या प्रती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उपलब्ध करुन दिल्या आहेत. ते प्रत्येक उमेदवारांच्या नियतवाटप केलेल्या विभागात उमेदवारांच्या प्रोफाईल सोबत नियुक्ती प्राधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. उमेदवारांच्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत/अर्जातील फोटो यावरुन प्रत्यक्षात रुजू झालेला उमेदवार तोच आहे का, तसेच मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्रावरुन अर्जातील उमेदवाराचा फोटो व स्वाक्षरी, ओळखपत्रातील फोटो व स्वाक्षरी त्याच उमेदवाराची आहे का, सादर केलेले ओळखपत्र अधिकृत आहे का, याची नियुक्तीपूर्वी सखोल तपासणी करावी. तसेच उमेदवारांनी परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राची वैधता संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांकडून तपासून घेण्यात यावी. तद्‌नंतरच संबंधित उमेदवाराची सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती करण्यात यावी.

(११) साक्षांकन नमुना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवारांनी तो तेथून डाऊनलोड करावा. सदर साक्षांकन नमुना पूर्णपणे भरुन उमेदवाराने त्याचे नियतवाटप करण्यात आलेल्या विभाग/कार्यालयात हजर होताना सादर करावा. हजर झालेल्या उमेदवारांकडून साक्षांकन नमुने प्राप्त करुन घेतल्यानंतर उमेदवारांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : चापअ १००८/ प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दिनांक ९.१.२००९ मधील तरतुदी विचारात घेऊन पोलीस विभागाकडून करुन घ्यावी व अहवाल प्रतिकूल असल्यास, प्रस्तुत शासन निर्णयातील सूचनांनुसार संबंधित उमेदवारांच्याबाबत तातडीने कार्यवाही करुन तसे या विभागास अवगत करावे. **"प्रस्तुत उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी**

**करण्यापूर्वी करण्यात येणार असल्यामुळे त्यांची नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत करण्यात आली आहे व सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल."** असा स्पष्ट उल्लेख उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात करण्यात यावा. उमेदवाराच्या चारित्र्य पडताळणी संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक : चापअ १०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दिनांक २६.८.२०१४ मधील सूचनादेखील विचारात घेण्यात याव्यात.

(१२) प्रस्तुत परीक्षेचा अंतिम निकाल मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण व मा. उच्च न्यायालय येथे दाखल करण्यात आलेल्या विविध मुळ अर्ज/याचिका प्रकरणी होणाऱ्या अंतिम निकालाच्या अधीन राहून जाहीर करण्यात आला आहे, ही बाब विचारात घेऊन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०२१ प्रतिक्षायादीमधून उमेदवारांची शिफारस केली आहे याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.

(१३) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.टीआरएन-२०१४/३४२/ प्र.क्र.५०/ १४/ १२-अ, दिनांक २७.५.२०१४ व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.कअप-१२१४/प्र.क्र.६५/१४ब, दिनांक १३.५.२०१५ नुसार सर्व संवर्गातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार (पायाभूत) प्रशिक्षण अनिवार्य आहे. त्यानुसार प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांनी प्रशिक्षणासाठी सक्तीने उपस्थित राहणे गरजेचे असून, प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांना संबंधित विभागप्रमुख यांनी कार्यमुक्त करणे देखील सक्तीचे आहे.

(१४) **सहायक कक्ष अधिकाऱ्यांची मंत्रालयीन विभागासाठी पदे भरावयाची असल्याचे परीक्षेच्या जाहिरातीत स्पष्ट करण्यात आले होते. यास्तव नियतवाटप केलेल्या उमेदवारांची अन्य जिल्ह्यामध्ये नियुक्ती देण्याची विनंती मान्य केली जाणार नाही व या संदर्भातील अर्जाची दखल घेतली जाणार नाही. तसेच, अन्य विभाग/कार्यालयात पुर्नवाटप करण्याबाबतच्या विनंतीचाही विचार करण्यात येणार नाही.**

(१५) मुंबईबाहेरील उमेदवारांनी त्यांच्या मुंबईतील निवासस्थानाबाबतची व्यवस्था स्वत:च करावयाची असून त्यासाठी **मुदतवाढ दिली जाणार नाही.**

(१६) अस्थायी नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाण्याकरीता लागणारा प्रवास खर्च उमेदवाराने स्वत:च सोसावयाचा आहे.

(१७) उमेदवाराने नियुक्ती स्विकारल्यानंतर सोबत जोडलेला रुजू अहवाल या कार्यासनास तात्काळ सादर करावा.

(१८) विभाग/कार्यालयाने नियुक्तीसाठी रुजू होणाऱ्या उमेदवारांना तात्पुरती नियुक्ती देण्यात यावी व त्यासोबतचे प्रतिवेदन कोणत्याही परिस्थितीत नियुक्तीनंतर तात्काळ या विभागाकडे पाठविण्यात यावे.

(१९) उक्त नमूद अटींची पूर्तता न झाल्यास उमेदवारांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०५३१२००३२१०६०७ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.05.31 20:06:59 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**कार्यालयांसाठी सहपत्रे**

१) उमेदवारांच्या नावाची यादी (उमेदवारांचा भ्रमणध्वनी व ई मेल क्रमांकासह)

२) उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत व ओळखपत्राची प्रत,

३) सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०२१ साठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेल्या जाहिरातीची प्रत **(अधिसूचना),**

४) प्रतिवेदन नमूना (उमेदवार दिनांक **३०-०६-२०२३ पर्यंत** विभागात हजर न झाल्यास उमेदवाराच्या आवेदनपत्राच्या संगणकीय प्रतीसह) कोणत्याही परिस्थितीत दिनांक **०३-०७-२०२३** पर्यंत या विभागास पाठविण्यात यावा.

**प्रत :-**

१) सहसचिव/उपसचिव/अवर सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, यांना उपरोक्त सहपत्रांसह
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, त्रिशूल गोल्ड फिल्ड, प्लॉट नंबर ३४, सरोवर विहार समोर, सेक्टर ११, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई-४००६१४
३) सर्व संबंधित उमेदवार, यांना रुजू अहवालाचा नमुना प्रतीसह (ई मेल द्वारे)
४) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १४-अ) (संग्रहार्थ).

## सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०२१ मधून (प्रतिक्षायादीतून) मंत्रालयीन विभागात करावयाचे उमेदवारांचे नियतवाटप

## सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्र.एएससी १४२२/प्र.क्र.२३०/१४-अ,

## दिनांक : ३१ मे, २०२३ सोबतचे (विवरणपत्र "अ")

| अ.क्र. | म.लो.आ शिफारस क्रमांक | Name | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | म.लो.आ शिफारस प्रवर्ग | विभागाचे नाव |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 1 | MAHALE PUNAMSING SUBHASH | Unreserved | OPEN-General-WT-1 | सामान्य प्रशासन विभाग |
| 2 | 2 | More Nikhil Gangandhar | EWS | OPEN-General-WT-2 | विधि व न्याय विभाग |
| 3 | 3 | Vijay Nagnath Lamkane | Unreserved | OPEN-General-WT-3 | आदिवासी विकास विभाग |
| 4 | 4 | Patil Vishwajeet Vijay | EWS | EWS-General-WT-1 | गृह विभाग |
| 5 | 5 | ADSUL DADASAHEB VIJAYKUMAR | EWS | EWS-General-WT-2 | नियोजन विभाग |
| 6 | 6 | AJIT MAHADEV KOLE | EWS | EWS-General-WT-3 | नियोजन विभाग |
| 7 | 7 | Mane Jagdish Jalindar | EWS | EWS-General-WT-4 | सामान्य प्रशासन विभाग |
| 8 | 8 | GORE SANKET BABASAHEB | OBC | OBC-General-WT-1 | ग्राम विकास विभाग |
| 9 | 9 | TAHAKIK SACHIN ASHOK | OBC | OBC-General-WT-2 | विधि व न्याय विभाग |
| 10 | 10 | SAMBARKAR DEVLING TUKARAM | OBC | OBC-General-WT-3 | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| 11 | 11 | KANDE VIDYA ANKUSH | NT-D | OPEN-Female-WT-1 | ग्राम विकास विभाग |
| 12 | 12 | PATIL SAYALI VISHWANATH | EWS | OPEN-Female-WT-2 | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| 13 | 13 | KADAM MANISHA NYANU | EWS | OPEN-Female-WT-3 | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| 14 | 14 | CHANDANKAR PRAJAKTA PARMESHWAR | EWS | EWS-Female-WT-1 | नियोजन विभाग |
| 15 | 15 | PISE PRAGATI SARJERAO | NT-C | NT-C-Female-WT-1 | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| 16 | 16 | MOHITE PRANOTI SANJIVAN | OBC | OBC-Female-WT-1 | उच्च व तंत्र शिक्षण विभाग |
| 17 | 17 | NIRMAL MAYURI JALINDAR | OBC | OBC-Female-WT-2 | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |
| 18 | 18 | MORE AKASH BHIMRAO | SC | SC-General-WT-1 | पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग |

| अ.क्र. | म.लो.आ शिफारस क्रमांक | Name | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | म.लो.आ शिफारस प्रवर्ग | विभागाचे नाव |
|---|---|---|---|---|---|
| 19 | 19 | KHANDARE VISHWAJIT ASHOKRAO | SC | SC-General-WT-2 | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| 20 | 20 | KHARE ROHIT RAJENDRA | SC | SC-General-WT-3 | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| 21 | 21 | GAIKWAD SANTOSH BHASKAR | SC | SC-General-WT-4 | दिव्यांग कल्याण विभाग |
| 22 | 22 | BAMANE NAGESHA RAMU | SC | SC-General-WT-5 | दिव्यांग कल्याण विभाग |
| 23 | 23 | SHINGANKAR ANIKET OMPRAKASH | SC | SC-General-WT-6 | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| 24 | 24 | GODE VRUSHALI JIJABHAU | ST | ST-Female-WT-1 | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| 25 | 25 | BHOYAR GULSHAN DASHRATH | ST | ST-General-WT-1 | विधि व न्याय विभाग |
| 26 | 26 | WANTEKAR SANJEEVANI GANGADHAR | ST | ST-Female-WT-2 | कृषि व पदुम विभाग |
| 27 | 27 | PAGALWAD LAXMI BABURAO | ST | ST-Female-WT-3 | सामान्य प्रशासन विभाग |
| 28 | 28 | GARUD SANKET GOKUL | Unreserved | Divyang-ID / MD-WT-1 | गृह विभाग |
| 29 | 29 | SAVALKAR RAJIV RAVINDRA | NT-C | Divyang-ID / MD-WT-2 | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |

# <u>उमेदवारांसाठी रुजू अहवाल</u>

| | | |
|---|---|---|
| उमेदवाराचे नांव | : | |
| उमेदवाराची जन्मतारीख | : | |
| उमेदवाराची शैक्षणिक अर्हता | : | |
| उमेदवाराचा शिफारस क्रमांक | : | |
| उमेदवाराचा स्वत:चा मूळ प्रवर्ग | : | |
| म.लो.आ. ने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | : | |
| उमेदवाराचा भ्रमणध्वनी क्रमांक | : | |
| उमेदवाराचा ई-मेल आय.डी. | : | |

प्रति,

अवर सचिव (कार्यासन १४-अ),
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, ५ वा मजला, खोली क्रमांक ५५७ (विस्तारित)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

**विषय:** सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०२१ मधून (प्रतिक्षायादीतून) मंत्रालयीन विभागात रुजू झाल्याचा अहवाल.

महोदया,

मी खाली सही करणार श्री/श्रीमती ____________________________ नमूद करतो/करते की, आपले ज्ञापन क्रमांक एएससी १४२२/प्र.क्र.२३०/१४-अ, दिनांक ३१-०५ -२०२३, नुसार मी ________________________________________ विभाग/कार्यालयात दिनांक ________________ रोजी रुजू झालो/झाले. सदरहू माहिती आपणास उचित कार्यवाहीसाठी कळविण्यात येत आहे.

आपला/आपली विश्वासू,

(                              )
उमेदवाराची सही व नांव

**<u>टीप :</u>**

(१) नियतवाटप केलेल्या विभाग/कार्यालयात हजर झाल्यानंतर उमेदवाराने तात्काळ वरील पत्र या विभागाकडे (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १४-अ) पाठवावे. अन्यथा त्यांना दिलेली नियुक्ती त्यांनी स्विकारली नाही असे समजून योग्य ती पुढील कार्यवाही केली जाईल याची त्यांनी नोंद घ्यावी

(२) ज्ञापनामध्ये उमेदवाराच्या नावापुढे दर्शविलेला क्रमांक हा त्याचा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडील शिफारस यादीतील क्रमांक आहे. तो क्रमांक वर दर्शविलेल्या ठिकाणी नमूद करावा.

## नियतवाटप केलेल्या आयोग पुरस्कृत उमेदवारासंबंधी प्रतिवेदन

क्रमांक : (विभाग/कार्यालयाचे नांव व पत्ता)
दिनांक :

प्रति,
अवर सचिव (कार्यासन १४-अ),
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
५ वा मजला, खोली क्रमांक ५५७ (विस्तारित)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

विषय :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांची सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०२१
संदर्भ :- सामान्य प्रशासन विभागाचे क्र.एएससी १४२२/प्र.क्र.२३०/१४-अ, दिनांक ३१-०५-२०२३ चे ज्ञापन.

संदर्भाधिन उमेदवारांबाबतचे प्रतिवेदन पुढीलप्रमाणे आहे :-

**(अ) नियुक्ती स्विकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | शिफारस क्रमांक |
|---|---|---|
| | | |

**(ब) नियुक्ती न स्विकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | शिफारस क्रमांक |
|---|---|---|
| | | |

वरील (अ) येथे दर्शविलेल्या उमेदवारांनी योग्य ती प्रमाणपत्रे सादर केली असून ते सहायक कक्ष अधिकारी पदावरील नियुक्तीकरीता आवश्यक त्या सर्व अटी पूर्ण करीत असल्याने त्यांच्या नेमणुकीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले असून त्यांच्या प्रती सोबत जोडण्यात आल्या आहेत. तसेच विहित कालावधीत नियुक्ती न स्विकारणाऱ्या (ब) येथे दर्शविलेल्या उमेदवारांचे मूळ अर्ज (उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत) सोबत परत पाठविण्यात येत आहेत.

सहपत्र :- वरीलप्रमाणे (सही व पदनाम)

| अ.क्र. | मंत्रालयीन विभागातील कार्यालय यांचे पत्ते |
|---|---|
| १ | अवर सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, ५ वा मजला, दालन क्र.५५३ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२८८१८९७ |
| २ | अवर सचिव (आस्थापना), गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र. २२०२५०८८, २२७९३८५८ |
| ३ | अवर सचिव (आस्थापना), महसूल व वन विभाग, पहिला मजला, मंत्रालय, मुख्य इमारत, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र. २२०४८५०४/२२७९३८०० |
| ४ | अवर सचिव (आस्थापना), कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, ५ वा मजला, दालन क्र.५२२ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६९०, २२८१३३४७ |
| ५ | अवर सचिव (आस्थापना), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , दालन क्र.४४० (विस्तार), ४ था मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र. २२७९३१६८, २२०४६२५९ |
| ६ | अवर सचिव (आस्थापना), नगर विकास विभाग, ४ था मजला, मंत्रालय मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र. २२७९४१९७, २२७९४१९४, २२८२०४५५ |
| ७ | अवर सचिव (आस्थापना), वित्त विभाग, ३ रा मजला, दालन क्र.३१९ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३२६९, २२८२६८११ |
| ८ | अवर सचिव (आस्थापना), सार्वजनिक बांधकाम विभाग, २ रा मजला, दालन क्र.२६० ( विस्तार ), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३८४७, २२८१४९७१ |
| ९ | अवर सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग, ३ रा मजला, मंत्रालय, मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र. २२७९४१७६ |
| १० | अवर सचिव (आस्थापना), विधि व न्याय विभाग, ५ वा मजला, मंत्रालय, मुख्य इमारत, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६१०, २२०२८५०० |
| ११ | अवर सचिव (आस्थापना), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दालन क्र.१२० (विस्तार), पहिला मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३७२१, २२८१०३९४ |
| १२ | अवर सचिव (आस्थापना), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, विस्तार इमारत पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३२३७ |
| १३ | अवर सचिव (आस्थापना), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, २ रा मजला, दालन क्र.२१९ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३०५० |
| १४ | अवर सचिव (आस्थापना), नियोजन विभाग, ६ वा मजला, दालन क्र.६९८ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९४११६, २२०२२५९६ |
| १५ | अवर सचिव (आस्थापना), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, पहिला मजला, दालन क्र.१५६ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३०२५, २२८२०२०१ |
| १६ | अवर सचिव (आस्थापना), संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, विस्तार इमारत पोटमाळा, दालन क्र.१५६ (विस्तार), मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३४१८ |
| १७ | अवर सचिव (आस्थापना), गृहनिर्माण विभाग, ३ रा मजला, मंत्रालय मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र.२२७९३८६३ |
| १८ | अवर सचिव (आस्थापना), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला, क्रॉफर्ड मार्केट समोर, मुंबई ४०० ००१. दूरध्वनी क्र.२२६१६७०२, २२६१६७०१ |
| १९ | अवर सचिव (आस्थापना), सार्वजनिक आरोग्य विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, शासकीय इमारत, १० वा मजला, क्रॉफर्ड मार्केट समोर, मुंबई ४०० ००१. दूरध्वनी क्र. २२६१७५१०- विस्तार क्र.२१२ |

| | |
|---|---|
| २० | अवर सचिव (आस्थापना), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, शासकीय इमारत, ९ वा मजला, क्रॉफर्ड मार्केट समोर, मुंबई ४०० ००१. दूरध्वनी क्र.२२६२६५१२ |
| २१ | अवर सचिव (आस्थापना), आदिवासी विकास विभाग, पहिला मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३०३१ |
| २२ | अवर सचिव (आस्थापना), पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, १५ वा मजला, नवीन प्रशासन इमारत, मंत्रालयासमोर, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र.२२८७३७५५, २२७९३१३१ |
| २३ | अवर सचिव (आस्थापना), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, ३ रा मजला, दालन क्र.३१७ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६४२ |
| २४ | अवर सचिव (आस्थापना), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, ४ था मजला, दालन क्र.४३९ (विस्तार), मंत्रालय , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३९१४ |
| २५ | अवर सचिव (आस्थापना), महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र.२२७९४१४१, २२८२४९६६ |
| २६ | अवर सचिव (आस्थापना), कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता विभाग, २ रा मजला, मंत्रालय मुख्य इमारत, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र. २२७९३९६७/२२०४८३०६/२२०४७२३६ |
| २७ | अवर सचिव (आस्थापना), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, ७ वा मजला मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९४१८३/२२०२५६०८ |
| २८ | अवर सचिव (आस्थापना), अल्पसंख्याक विकास विभाग, ७ वा मजला, दालन क्र.७०१ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२०२५४०८ |
| २९ | अवर सचिव (आस्थापना), मराठी भाषा विभाग, मंत्रालयासमोर, ८ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र.२२०२५९३३/२२७९४१७० |
| ३० | अवर सचिव (आस्थापना), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, १ ला मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. |
| ३१ | अवर सचिव (आस्थापना), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, विस्तार इमारत पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३२३७ |
| ३२ | अवर सचिव (आस्थापना), दिव्यांग कल्याण विभाग, मित्तल टॉवर,A विंग, ३ रा मजला, नरीमन पॉईट, मुंबई-४०००२१ दुरध्वनी क्र. ४०१४५१४५. |






महाराष्ट्र शासन

**महाराष्ट्र लोकसेवा आयोग**

मुख्य कार्यालय : ५, ७, ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई - ४०००२१ ☎२२७९५९००
फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा मजला, फोर्ट, मुंबई-४००००१ ☎२२१०२२२२
Email ID : contact-secretary@mpsc.gov.in Website : https://mpsc.gov.in , https://mpsconline.gov.in

# महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब संयुक्त पूर्व परीक्षा - २०२१

**क्रमांक : सीएमए-०४२१/सीआर-०१/२०२१/जाहिरात** **जाहिरात क्रमांक :२४९/२०२१**

महाराष्ट्र शासनाच्या विविध विभागांतर्गत खालील संवर्गातील एकूण **६६६** पदांच्या भरतीकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत **महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब संयुक्त पूर्व परीक्षा-२०२१, रविवार, दिनांक २६ फेब्रुवारी, २०२२** रोजी महाराष्ट्रातील एकूण ३७ जिल्हा केंद्रांवर घेण्यात येईल :-

२. प्रस्तुत परीक्षेमधून भरावयाच्या विविध संवर्गातील पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| प्रवर्ग | अ.जा. | अ.ज. | वि.जा. (अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | इ.मा.व. | वि.मा.प्र. | आ.दु.घ. | एकूण आरक्षित पदे | अराखीव पदे | एकूण पदे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **१.१ सामान्य प्रशासन विभाग :-** | | | | | | | | | | | | |
| **सहायक कक्ष अधिकारी, गट-ब (अराजपत्रित) (एकूण १०० पदे)** | | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | १७ | ९ | २ | १ | ४ | -- | १८ | -- | १० | ६१ | ३९ | १०० |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :- | | | | | | | | | | | | |
| (१) सर्वसाधारण | ११ | ६ | १ | १ | ३ | -- | १२ | -- | ६ | ४० | २५ | ६५ |
| (२) महिला | ५ | ३ | १ | -- | १ | -- | ५ | -- | ३ | १८ | १२ | ३० |
| (३) खेळाडू | १ | -- | -- | -- | -- | -- | १ | -- | १ | ३ | २ | ५ |
| (४) दिव्यांग | एकूण ४ पदे(विशिष्ट शिक्षण अक्षमता(SLD) व मानसिक आजार(MI) या दिव्यांग प्रकारासाठी किंवा बहिरेपणा व अंधत्वासह एकापेक्षा जास्त प्रकारचे दिव्यांगत्व) | | | | | | | | | | | |
| (५) अनाथ | एकूण १ पद | | | | | | | | | | | |
| **१.२ वित्त विभाग :-** | | | | | | | | | | | | |
| **राज्य कर निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित) (एकूण १९० पदे)** | | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | २५ | १३ | ५ | ४ | ७ | ३ | ३४ | ३ | १९ | ११३ | ७७ | १९० |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :- | | | | | | | | | | | | |
| (१) सर्वसाधारण | १७ | ८ | ४ | ३ | ५ | २ | २२ | २ | १२ | ७५ | ४९ | १२४ |
| (२) महिला | ७ | ४ | १ | १ | २ | १ | १० | १ | ६ | ३३ | २४ | ५७ |
| (३) खेळाडू | १ | १ | -- | -- | -- | -- | २ | -- | १ | ५ | ४ | ९ |
| (४) दिव्यांग | एकूण — ८ पदे(२ - अंधत्व किंवा क्षीणदृष्टी, २ - श्रवणशक्तीतील दोष, २ - चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदूचा अर्धांगवायू, २ - मंदबुद्धी, मानसिक आजार, एकापेक्षा अधिक प्रकारचे अपंगत्व) | | | | | | | | | | | |
| (५) अनाथ | एकूण — २ पदे | | | | | | | | | | | |
| **१.३ गृह विभाग :-** | | | | | | | | | | | | |
| **पोलीस उपनिरीक्षक, गट-ब (अराजपत्रित) (एकूण ३७६ पदे)** | | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | ७६ | ३९ | ११ | ८ | २७ | १८ | ५३ | १३ | ३७ | २८२ | ९४ | ३७६ |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :- | | | | | | | | | | | | |
| (१) सर्वसाधारण | ४९ | २५ | ७ | ६ | १८ | १२ | ३४ | ८ | २४ | १८३ | ६१ | २४४ |
| (२) महिला | २३ | १२ | ०३ | २ | ८ | ५ | १६ | ४ | ११ | ८४ | २८ | ११२ |
| (३) खेळाडू | ४ | २ | १ | -- | १ | १ | ३ | १ | २ | १५ | ५ | २० |
| (४) दिव्यांग | -- | | | | | | | | | | | |
| (५) अनाथ | एकूण पदे -४ | | | | | | | | | | | |

**३.** पूर्व परीक्षेच्या निकालाधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांकरीता मुख्य परीक्षा माहे मे **,२०२२** किंवा त्यानंतर आयोजित होण्याची शक्यता आहे.

**४.** प्रस्तुत जाहिरातीमध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीची पुर्तता करणा-या उमेदवारांकडून आयोगाच्या ऑनलाईन अर्ज प्रणालीद्वारे अर्ज मागविण्यात येत आहेत.

**५. पदसंख्या व आरक्षणासंदर्भात सर्वसाधारण तरतुदी :-**

**५.१** संवर्गातील पदसंख्या व आरक्षणामध्ये शासनाच्या संबंधित विभागांच्या सूचनेनुसार बदल होण्याची शक्यता आहे.

**५.२** पदसंख्या व आरक्षणामध्ये बदल झाल्यास त्याचा समावेश मुख्य परीक्षेच्या अधिसूचनेमध्ये करण्यात येईल. तसेच याबाबतची घोषणा/सूचना वेळोवेळी आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येईल. संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेल्या घोषणा/सूचनांच्या आधारे प्रस्तुत परीक्षेमधून भरावयाच्या पदाकरीता भरती प्रक्रिया राबविण्यात येईल.

**५.३** पूर्व परीक्षेचा निकाल अंतिम करेपर्यंतच्या कालावधीपर्यंत शासनाकडून सुधारित/अतिरिक्त मागणीपत्राद्वारे प्राप्त होणारी सर्व पदे पूर्व परीक्षेच्या निकालासाठी विचारात घेण्यात येतील.

**५.४** प्रस्तुत जाहिरातीमध्ये नमूद संवर्गामध्ये काही मागास प्रवर्ग व समांतर आरक्षणाची पदे (महिला, दिव्यांग व्यक्ती, खेळाडू, अनाथ) उपलब्ध नाहीत. तथापि, जाहिरात प्रसिध्द झाल्यानंतर तसेच पूर्व परीक्षेचा निकाल अंतिम करेपर्यंत नव्याने प्राप्त होणा-या मागणीपत्रांमध्ये जाहिरातीत नमूद नसलेल्या मागास प्रवर्ग तसेच समांतर आरक्षणाकरीता पदे उपलब्ध होण्याची आणि विद्यमान पदसंख्येमध्ये बदल/वाढ होण्याची शक्यता आहे. सदर बदललेली पदसंख्या/अतिरिक्त मागणीद्वारे प्राप्त संवर्गातील पदे पूर्व परीक्षेचा निकाल अंतिम करताना विचारात घेतली जाईल. यास्तव पूर्व परीक्षेच्या जाहिरातीमध्ये पद आरक्षित नसल्यामुळे अथवा पदसंख्या कमी असल्यामुळे पूर्व परीक्षेसाठी अर्ज सादर केला नसल्याची व त्यामुळे निवडीची संधी वाया गेल्याबाबतची तक्रार नंतर कोणत्याही टप्प्यावर विचारात घेतली जाणार नाही.

**५.४** महिला, खेळाडू तसेच अनाथांसाठीचे समांतर आरक्षण शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

**५.५** महिलांसाठी आरक्षित पदांकरिता दावा करणा-या उमेदवारांनी महिला आरक्षणाचा लाभ घ्यावयाचा असल्यास त्यांनी अर्जामध्ये न चुकता महाराष्ट्राचे अधिवासी (Domiciled) असल्याबाबत तसेच नॉन क्रीमीलेअर मध्ये मोडत असल्याबाबत (अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती वगळून) स्पष्टपणे दावा करणे आवश्यक आहे.

**५.६** विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती. (ब), भटक्या जमाती (क) व भटक्या जमाती (ड) प्रवर्गासाठी आरक्षित असलेली पदे आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदासाठी संबंधित प्रवर्गातील योग्य व पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास अद्ययावत शासन धोरणाप्रमाणे उपलब्ध प्रवर्गातील उमेदवाराचा विचार गुणवत्तेच्या आधारावर करण्यात येईल.

**५.७** अर्ज करताना एखादी जात/जमात राज्य शासनाकडून आरक्षणासाठी पात्र असल्याचे घोषित केली असल्यासच तसेच सक्षम प्राधिकाऱ्याने प्रदान केलेले प्रमाणपत्र उमेदवाराकडे उपलब्ध असेल तर संबंधित जात/जमातीचे उमेदवार आरक्षणाच्या दाव्यासाठी पात्र असतील.

**५.८** समांतर आरक्षणाबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०१२/प्र.क्र.१६/१२/१६-अ, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ तसेच शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक संकीर्ण-१११८/प्र.क्र.३९/१६-अ, दिनांक १९ डिसेंबर, २०१८ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**५.९** आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांतील (ईडब्लूएस) उमेदवारांकरीता शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :राआधो-४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१९ व दिनांक ३१ मे, २०२१ अन्वये विहित करण्यात आलेले प्रमाणपत्र, कागदपत्र पडताळणीच्या वेळी सादर करणे आवश्यक राहील.

**५.१०** अद्ययावत नॉन क्रिमीलेयर प्रमाणपत्र/आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील असल्याबाबतचा पुरावा म्हणून सक्षम प्राधिकाऱ्याने वितरित केलेले व अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास वैध असणारे (वित्तीय वर्ष २०२१-२२ ) प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

**५.११** सेवा प्रवेशाच्या प्रयोजनासाठी शासनाने मागास म्हणून मान्यता दिलेल्या समाजाच्या वयोमर्यादेमध्ये सवलत घेतलेल्या उमेदवारांचा अराखीव (खुला) पदावरील निवडीकरीता विचार करणेबाबत शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करण्यात येईल. याबाबतचा तपशील वेळोवेळी आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात येईल.

**५.१२** अराखीव (खुला) उमेदवारांकरीता विहित केलेल्या वयोमर्यादा तसेच इतर पात्रता विषयक निकषासंदर्भातील अटींची पुर्तता करणा-या सर्व उमेदवारांचा (मागासवर्गीय उमेदवारांसह) अराखीव (खुला) सर्वसाधारण पदावरील शिफारशीकरीता विचार होत असल्याने, सर्व आरक्षित प्रवर्गातील उमेदवारांनी त्यांच्या प्रवर्गासाठी पद आरक्षित/उपलब्ध नसले तरी, अर्जामध्ये त्यांच्या मूळ प्रवर्गासंदर्भातील माहिती अचूकपणे नमूद करणे बंधनकारक आहे.

**५.१३** कोणत्याही प्रकारच्या आरक्षणाचा लाभ हा केवळ महाराष्ट्राचे सर्वसाधारण रहिवासी असणाऱ्या उमेदवारांना अनुज्ञेय आहे. सर्वसाधारण रहिवासी या संज्ञेला भारतीय लोकप्रतिनिधत्व कायदा १९५० च्या कलम २० अनुसार जो अर्थ आहे तोच अर्थ असेल.

**५.१४** कोणत्याही प्रकारच्या आरक्षणाचा (सामाजिक अथवा समांतर) अथवा सोयी सवलतींचा दावा करणा-या उमेदवाराकडे संबंधित कायदा / नियम / आदेशानुसार विहित नमुन्यातील प्रस्तुत जाहिरातीस अनुसरुन अर्ज स्वीकारण्यासाठी विहित केलेल्या दिनांकापूर्वीचे वैध प्रमाणपत्र उपलब्ध असणे अनिवार्य आहे.

**५.१५** सामाजिक व समांतर आरक्षणासंदर्भात विविध न्यायालयामध्ये दाखल न्यायप्रविष्ट प्रकरणी अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदभरतीची कार्यवाही करण्यात येईल.

**५.१६ खेळाडू आरक्षण :-**

**५.१६.१** शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १ जुलै, २०१६, तसेच शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८ ऑगस्ट, २०१६, शुध्दीपत्रक क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ११ मार्च, २०१९ व शासन शुद्धिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक २४ ऑक्टोबर, २०१९ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणासंदर्भात तसेच वयोमर्यादेतील सवलतीसंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

**५.१६.२** प्राविण्य प्राप्त खेळाडू व्यक्तींसाठी असलेल्या आरक्षणाचा दावा करणा-या उमेदवारांच्या बाबतीत क्रीडा विषयक विहित अर्हता धारण करीत असल्याबाबत सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले पात्र खेळाचे प्राविण्य प्रमाणपत्र पूर्व परीक्षेस अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकाचे किंवा तत्पूर्वीचे असणे बंधनकारक आहे.

**५.१६.३** खेळाचे प्राविण्य प्रमाणपत्र योग्य दर्जाचे असल्याबाबत तसेच तो खेळाडू उमेदवार खेळाडूसाठी आरक्षित पदावरील निवडीकरीता पात्र ठरतो, याविषयीच्या पडताळणीकरीता त्यांचे प्राविण्य प्रमाणपत्र संबंधित विभागीय उपसंचालक कार्यालयाकडे पूर्व परीक्षेस अर्ज सादर करण्याच्या दिनांकापूर्वीच सादर केलेले असणे बंधनकारक आहे. अन्यथा प्राविण्य प्राप्त खेळाडूसाठी आरक्षणाकरीता पात्र समजण्यात येणार नाही.

**५.१६.४** कागदपत्रे पडताळणी/मुलाखतीच्यावेळी खेळाडू उमेदवारांनी विहित अर्हता धारण करीत असल्याबाबत सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले प्राविण्य प्रमाणपत्र तसेच त्यांचे प्राविण्य प्रमाणपत्र योग्य असल्याबाबत तसेच खेळाडू कोणत्या संवर्गातील खेळाडूसाठी आरक्षित पदावरील निवडीकरीता पात्र ठरतो, याविषयीचा सक्षम प्राधिका-याने प्रदान केलेले प्राविण्य प्रमाणपत्र पडताळणीबाबतचा अहवाल सादर केला तरच उमेदवारांचा संबंधित संवर्गातील खेळाडूसाठी आरक्षित पदावर शिफारशी/नियुक्तीकरीता विचार करण्यात येईल.

**५.१६.५** एकापेक्षा जास्त खेळांची प्राविण्य प्रमाणपत्रे असणा-या खेळाडू उमेदवाराने एकाच वेळेस सर्व खेळांची प्राविण्य प्रमाणपत्रे प्रमाणित करण्याकरीता संबंधित उपसंचालक कार्यालयाकडे सादर करणे बंधनकारक आहे.

**५.१७ दिव्यांग आरक्षण :-**

**५.१७.१** दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ च्या आधारे शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक दिव्यांग २०१८/प्र.क्र.११४/१६ अ, दिनांक २९ मे, २०१९ तसेच यासंदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार दिव्यांग व्यक्तींच्या आरक्षणासंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

**५.१७.२** प्रस्तुत परीक्षेमधून भरण्यात येणा-या संवर्ग/पदांच्या बाबतीत खालील पदांसमोर दर्शविलेल्या शारीरिक पात्रतेचे निकष धारण करणारे उमेदवार संबंधित पदावर नियुक्तीसाठी पात्र अथवा अपात्र असतील :-

| अ.क्र. | पदाचे नांव | शासन आदेश | दिव्यांगत्वाचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | सहायक कक्ष अधिकारी | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. कअस-१३१९/प्र.क्र.७४/१४-ब, दिनांक २६ फेब्रुवारी, २०२१ | (1) B, LV<br>(2) D, HH,<br>(3) OA, BA, OL, BL, OAL, CP, LC, DW, AAV,<br>(4) SLD, MI<br>(5) MD involving (1) to (4) above |
| २ | राज्य कर निरीक्षक | शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विकवि-१०२१/प्र.क्र.१३/वि.प्र.-४, दिनांक २५ फेब्रुवारी, २०२१ | (1) B, LV<br>(2) D, HH,<br>(3) OA, BA, OL, BL, OAL, CP, LC, DW, AAV,<br>(4) SLD, MI<br>(5) MD involving (1) to (4) above |
| ३ | पोलीस उपनिरीक्षक | शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक पोलीस-१८२१/प्र.क्र.५२/पोल-५अ, दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१ | दिव्यांग उमेदवार पात्र नाही. |

**५.१७.३** दिव्यांग व्यक्तींसाठी असलेली पदे भरावयाच्या एकूण पदसंख्येपैकी असतील.

**५.१७.४** दिव्यांग व्यक्तींची संबंधित संवर्ग/पदाकरीता पात्रता शासनानाकडून वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

**५.१७.५** दिव्यांग व्यक्तींसाठी आरक्षित पदांवर शिफारस करताना उमेदवार कोणत्या सामाजिक प्रवर्गातील आहे, याचा विचार न करता दिव्यांग गुणवत्ता क्रमांकानुसार त्यांची शिफारस करण्यात येईल.

**५.१७.६** संबंधित दिव्यांगत्वाच्या प्रकारचे किमान ४०% दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र धारक उमेदवार / व्यक्ती आरक्षण तसेच नियमानुसार अनुज्ञेय सोयी / सवलतीसाठी पात्र असतील.

**५.१७.७** लक्षणीय दिव्यांगत्व असलेले उमेदवार / व्यक्ती खालील सवलतींच्या दाव्यास पात्र असतील:-

(१) दिव्यांगत्वाचे प्रमाण किमान ४०% अथवा त्यापेक्षा जास्त असल्यास तसेच पद लक्षणीय दिव्यांग व्यक्तींसाठी आरक्षित असल्यास नियमानुसार अनुज्ञेय आरक्षण व इतर सोयी सवलती

(२) दिव्यांगत्याचे प्रमाण किमान ४०% अथवा त्यापेक्षा जास्त असल्यास तसेच पद संबंधित दिव्यांग प्रकारासाठी सुनिश्चित केले असल्यास नियमानुसार अनुज्ञेय सायी सवलती

**५.१७.८** दिव्यांग व्यक्तींसाठी असलेल्या वयोमर्यादेचा अथवा इतर कोणत्याही प्रकारचा फायदा घेऊ इच्छिणा-या उमेदवारांनी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक अप्रकि-२०१८/प्र.क्र.४६/आरोग्य-६, दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ मधील आदेशानुसार केंद्र शासनाच्या www.swavlambancard.gov.in अथवा SADM या संगणकीय प्रणालीदवारे वितरित करण्यात आलेले नवीन नमुन्यातील दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे.

**५.१८ अनाथ आरक्षण :-**

**५.१८.१** अनाथ व्यक्तींचे आरक्षण शासन निर्णय, महिला व बालविकास विभाग, क्रमांक : अनाथ-२०१८/प्र.क्र.१८२/का-०३, दिनांक २३ ऑगस्ट, २०२१ तसेच यासंदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात येणा-या आदेशानुसार राहील.

**५.१८.२** अनाथांसाठी आरक्षित पदावर गुणवत्तेनुसार निवड झालेल्या उमेदवारांचा समावेश उमेदवार ज्या सामाजिक प्रवर्गाचा आहे; त्या प्रवर्गातून करण्यात येईल.

**५.१८.३** पूर्व परीक्षेच्या अर्जाद्वारे अनाथ आरक्षणाचा दावा केलेल्या उमेदवारांनी त्यांचेकडे सद्यस्थितीत उपलब्ध असलेले प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे. तसेच दिनांक २३ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीनुसार सुधारित नमुन्यातील अनाथ प्रमाणपत्र व महाराष्ट्र राज्याचे अधिवास प्रमाणपत्र आयोगाकडून निश्चित करण्यात येणाऱ्या विहित कालावधीत सादर करणे आवश्यक राहील. अन्यथा अनाथ आरक्षणाचा दावा विचारात घेतला जाणार नाही.

**६. वेतनश्रेणी :-**

एस-१४, रुपये ३८६००-१२२८०० अधिक महागाई भत्ता व नियमाप्रमाणे देय इतर भत्ते.

**७. पात्रता :-**

**७.१** भारतीय नागरिकत्व

**७.२ वयोमर्यादा :-**

| अ. क्र. | संवर्ग | वयोमर्यादा गणण्याचा दिनांक | वय | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | किमान | कमाल | | प्राविण्य प्राप्त खेळाडू | | माजी सैनिक, आणिबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकारी | | दिव्यांग उमेदवार |
| | | | अमागास / मागासवर्गीय/ आ. दु. घ. | अमागास | मागासवर्गीय/ अनाथ/ आ. दु. घ. | अमागास | मागासवर्गीय / आ. दु. घ. | अमागास | मागासवर्गीय/ आ. दु. घ. | |
| १ | सहायक कक्ष अधिकारी | १ फेब्रुवारी, २०२२ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत |
| २ | राज्य कर निरीक्षक | १ जानेवारी, २०२२ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | १ फेब्रुवारी, २०२२ | १९ | ३१ | ३४ | ३६ | ३६ | ३६ | ३६ | अपात्र |

**७.३** विहित वयोमर्यादा इतर कोणत्याही बाबतीत शिथिल केली जाणार नाही.

**७.४ शैक्षणिक अर्हता :-**

**७.४.१** सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा तिच्याशी समतुल्य असणारी शासनाने घोषित केलेली इतर कोणतीही तत्सम अर्हता.

**७.४.२** पदवी परीक्षेस बसलेले उमेदवार प्रस्तुत संयुक्त पूर्व परीक्षेस तात्पुरते पात्र असतील. परंतु संयुक्त पूर्व परीक्षेच्या निकालाआधारे संबंधित संवर्गाकरीता घेण्यात येणा-या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरणा-या उमेदवारांनी संबंधित संवर्गाच्या मुख्य परीक्षेकरीता अर्ज स्वीकारण्यासाठी विहित केलेल्या अंतिम दिनांकापर्यंत पदवी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

**७.४.३** अंतर्वासिता (Internship) किंवा कार्यशाळेतील कामाचा अनुभव आवश्यक असेल अशा पदवीधारकाने ही अट मुख्य परीक्षेचे अर्ज स्वीकारण्याच्या विहित अंतिम दिनांकापर्यंत पूर्ण केली असली पाहीजे.

**७.४.४** मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.

**७.५ अर्हता/पात्रता गणण्याचा दिनांक :-**

मुख्य परीक्षेकरीता अर्ज स्वीकारण्यासाठी विहित अंतिम दिनांकापर्यंत किंवा त्यापूर्वी विहित शैक्षणिक अर्हता धारण केलेली असणे अनिवार्य आहे.

**७.६ शारीरिक मोजमापे/अर्हता :-**

**७.६.१ पोलीस उपनिरीक्षक पदासाठी विकल्प नमूद करणा-या उमेदवारांकडे उपरोक्त अर्हतेसोबत खालीलप्रमाणे किमान शारीरिक अर्हता असणे आवश्यक आहे :-**

| पुरुष | महिला |
|---|---|
| (१) उंची - १६५ सें. मी. (अनवाणी) (कमीत कमी)<br>(२) छाती - न फुगविता ७९ से.मी.<br>फुगविण्याची क्षमता किमान ५ से.मी. आवश्यक | उंची - १५७ सें.मी. (अनवाणी) (कमीत कमी) |

**७.६.२** पोलीस उपनिरीक्षक पदावरील नियुक्तीकरीता शिफारस झालेल्या उमेदवारांची शारिरिक मोजमापे नियुक्ती करण्यापूर्वी शासनामार्फत सक्षम प्राधिका-याकडून तपासून घेण्यात येतील. वरीलप्रमाणे विहित शारीरिक पात्रता नसल्यास संबंधित उमेदवार नियुक्तीसाठी अपात्र ठरेल.

**७.७ परीक्षेच्या संधी :-**

**७.७.१** आयोगामार्फत आयोजित होणाऱ्या विभिन्न स्पर्धा परीक्षांमध्ये भाग घेणाऱ्या उमेदवारांस संधीची कमाल मर्यादा खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आली आहे:-

(१) अराखीव (खुला) उमेदवारांस कमाल सहा संधी उपलब्ध राहतील.

(२) अनुसुचित जमाती व अनुसुचित जाती प्रवर्गातील उमेदवारांस कमाल संधीची मर्यादा लागू राहणार नाही.

(३) उर्वरित मागासवर्ग प्रवर्गातील उमेदवारांस कमाल नऊ संधी उपलब्ध राहतील.

**७.७.२** उमेदवारांची संधीची संख्या खाली नमूद केल्यानुसार लागू राहतील:

(१) उमेदवाराने पूर्व परीक्षेत भाग घेतल्यास, ही संबंधित स्पर्धा परीक्षेची संधी समजली जाईल.

(२) उमेदवार कोणत्याही कारणास्तव परीक्षेच्या कोणत्याही टप्प्यावर अपात्र ठरल्यास किंवा त्याची उमेदवारी रद्द झाल्यास तरीही त्याची परीक्षेस उपस्थिती संधी गणली जाईल.

(३) प्रत्येक परीक्षेसाठी संधीची गणना स्वतंत्रपणे करण्यात येईल.

(५) संबंधित संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमातील वयोमर्यादेच्या गणनेसह इतर अटी व शर्तीमध्ये कोणताही बदल नाही.

(६) शासनाकडून संबंधित सामाजिक प्रवर्गाकरीताची विहित केलेल्या उच्च वयोमर्यादेपर्यंतच उमेदवारास त्यांना देय असलेल्या संधीचा फायदा घेता येईल.

**७.७.३** प्रस्तुत परीक्षेपासून उपरोक्तप्रमाणे संधीची गणना करण्यात येईल.

**८. निवडप्रकिया :-**

**८.१** जाहिरातीमध्ये नमूद अर्हता/पात्रतेविषयक अटी किमान असून किमान अर्हता धारण केली म्हणून उमेदवार मुलाखत/शिफारशीसाठी पात्र असणार नाही.

**८.२** सेवा भरतीची संपूर्ण प्रक्रिया खालील सेवा प्रवेश नियम अथवा तदनंतर शासनाकडून वेळोवेळी करण्यात येणा-या सुधारणा तसेच आयोगाकडून वेळोवेळी सुधारण्यात येणाऱ्या कार्यनियमावलीतील तरतुदींनुसार राबविण्यात येईल :-

(१) सहायक कक्ष अधिकारी, गट-ब (अराजपत्रित) सेवाप्रवेश नियम २०१८

(२) राज्य कर निरीक्षक, (विक्रीकर निरीक्षक) गट-ब (अराजपत्रित) सेवाप्रवेश नियम १९९५

(३) पोलीस उप निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित) सेवाप्रवेश नियम १९९५

**९. परीक्षेचे टप्पे —**

**(एक) पूर्व परीक्षा - १०० गुण**

**(दोन) मुख्य परीक्षा - ४०० गुण**

**(तीन) फक्त पोलीस उपनिरीक्षक पदासाठी शारीरिक चाचणी — १०० गुण, मुलाखत-४० गुण**

**९.१** विविध संवर्गाकरीता भरती प्रक्रिया खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या टप्प्यामध्ये राबविण्यात येईल :-

| अ.क्र. | संवर्ग | टप्पे | संयुक्त पूर्व परीक्षेचे गुण | मुख्य परीक्षेचे गुण | शारीरिक चाचणीचे गुण | मुलाखतीचे गुण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | सहायक कक्ष अधिकारी | संयुक्त पूर्व परीक्षा व स्वतंत्र मुख्य परीक्षा | १०० | ४०० | -- | -- |
| २ | राज्य कर निरीक्षक | | | ४०० | -- | -- |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | संयुक्त पूर्व परीक्षा, स्वतंत्र मुख्य परीक्षा, शारीरिक चाचणी व मुलाखत | | ४०० | १०० | ४० |

**९.२** संयुक्त पूर्व परीक्षेच्या जाहिरातीस अनुसरुन अर्ज करणा-या उमेदवारांना, ते वरीलपैकी एक, दोन किंवा तीनही संवर्गासाठी बसू इच्छितात किंवा कसे याबाबत विकल्प (Option) द्यावा लागेल.

९.३ संबंधित संवर्गाकरीता उमेदवाराने दिलेला/ले विकल्प हा/हे संबंधीत संवर्ग भरतीकरीता अर्ज समजण्यात येईल/येतील.

९.४ संयुक्त पूर्व परीक्षेस अर्ज करताना दिलेला विकल्प तसेच, भरावयाच्या पदसंख्येच्या आधारे, संबंधित संवर्गाच्या मुख्य परीक्षेसाठी पात्र करावयाच्या उमेदवारांची संख्या निश्चित करुन, सामाईक पूर्व परीक्षेच्या आधारे तीनही संवर्गाकरीता पूर्व परीक्षेचा स्वतंत्र निकाल जाहीर करण्यात येईल.

**९.५ मुख्य परीक्षेस प्रवेश :-**

९.५.१ संयुक्त पूर्व परीक्षेच्या निकालाच्या आधारे संबंधित संवर्गाकरीता घेण्यात येणा-या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरणा-या उमेदवारांची संबंधित संवर्गाच्या परीक्षा योजना व अभ्यासक्रमाच्या आधारे स्वतंत्र मुख्य परीक्षा घेण्यात येईल. संबंधित संवर्गाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशाकरीता पात्र ठरलेल्या उमेदवारांनी प्रत्येक संवर्गाकरीता मुख्य परीक्षेसाठी स्वतंत्र अर्ज करणे आवश्यक राहील.

९.५.२ मुख्य परीक्षेमध्ये प्राप्त गुणांच्या आधारे संबंधित संवर्गाच्या परीक्षा योजनेनुसार, निवड प्रक्रिया पूर्ण करण्यात येईल. पूर्व परीक्षा केवळ मुख्य परीक्षेसाठी उमेदवारांची संख्या मर्यादित करण्यासाठी घेतली जात असल्याने पूर्व परीक्षेतील गुण निवडीसाठी विचारात घेतले जाणार नाहीत.

९.५.३ पोलीस उप निरीक्षक संवर्गाकरीता शारीरिक चाचणीच्या निकालाच्या आधारे मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच मुलाखतीसाठी बोलविण्यात येईल.

९.५.४ मुलाखत अथवा कागदपत्रे पडताळणीसाठी आमंत्रित केल्यानंतर पात्रतेसंदर्भातील सर्व आवश्यक मूळ प्रमाणपत्रे सादर करणे आवश्यक आहे. पात्रतेसंदर्भातील सर्व मूळ प्रमाणपत्रे मुलाखतीच्या अथवा प्रमाणपत्र पडताळणीच्यावेळी सादर न केल्यास मुलाखत घेतली जाणार नाही. तसेच, शिफारस/नियुक्तीसाठी विचार करण्यात येणार नाही.

९.५.५ विषयांकित संयुक्त पूर्व परीक्षेच्या निकालाधारे वेगवेगळया संवर्गाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांकरीता मुख्य परीक्षांचे दिनांक स्वतंत्रपणे जाहीर करण्यात येतील.

९.५.६ तीन संवर्गासाठी आयोजित महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षेचा पेपर क्रमांक १ हा सामाईक राहील. तसेच सदर पेपरची परीक्षा एकाच दिवशी घेण्यात येईल. मुख्य परीक्षेचा पेपर क्रमांक २ मात्र संबंधित संवर्गाची/पदाची कर्तव्ये व जबाबदा-या आणि अभ्यासक्रम लक्षात घेवून स्वतंत्र असेल.

९.५.७ मुख्य परीक्षेच्या परीक्षा योजनेमध्ये तसेच पोलीस उपनिरीक्षक संवर्गाच्या शारीरिक चाचणीच्या गुणदान पध्दतीमध्ये बदल/सुधारणा होण्याची शक्यता आहे. यासंदर्भात आयोगाच्या संकेतस्थळावर स्वतंत्रपणे घोषणा प्रसिध्द करण्यात येईल.

९.५.८ मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र उमेदवाराने आयोगाकडून निश्चित करण्यात आलेल्या कालावधीत आयोगाच्या https://mpsconline.gov.in या संकेतस्थळाव्दारे फक्त ऑनलाईन पध्दतीने आवश्यक अर्ज/माहिती सादर करणे आवश्यक राहील.

९.५.९ पूर्व परीक्षेच्या प्रवेशासाठी आयोगास अर्जाद्वारे सादर केलेल्या माहितीच्या आधारेच मुख्य परीक्षेकरीता आवश्यक अर्ज/माहिती विहित पध्दतीने सादर करता येईल.

**१०. पूर्व परीक्षेकरीता अर्ज करण्याची पध्दत :-**

**१०.१ अर्ज सादर करण्याचे टप्पे :-**

**(एक)** आवश्यक असल्यास खाते अद्ययावत करणे.

**(दोन)** विहित कालावधीत तसेच विहित पध्दतीने खालीलप्रमाणे लागू असेल त्याप्रमाणे आवश्यक कागदपत्रे अपलोड करुन अर्ज सादर करणे .

**(तीन)** परीक्षा शुल्काचा भरणा विहित पध्दतीने करणे.

**(चार)** जिल्हा केंद्र निवड करणे.

**१०.२ विहित कागदपत्रे/प्रमाणपत्रे अपलोड करणे :-**

**(एक)** प्रोफाईलद्वारे केलेल्या विविध दाव्यांच्या अनुषंगाने पूर्व परीक्षेकरीता अर्ज सादर करताना खेळाडू, दिव्यांग व अनाथ आरक्षणाचा दावा करणाऱ्या उमेदवारांव्यतिरिक्त अन्य उमेदवारांना कोणतीही कागदपत्रे अपलोड करण्याची आवश्यकता नाही.

**(दोन)** खेळाडू, दिव्यांग व अनाथ आरक्षणाचा दावा करणाऱ्या उमेदवारांची पात्रता आजमावल्यानंतर (Check eligibility) उमेदवार जाहिरातीनुसार पात्र ठरत असल्यास अर्ज सादर करताना खालील कागदपत्रे/प्रमाणपत्रे (लागू असलेली) अपलोड करणे अनिवार्य आहे :-

| अ. क्र. | प्रमाणपत्र/कागदपत्र | फाईल फॉर्मेट | किमान फाईल साईज (KB) | कमाल फाईल साईज (KB) |
|---|---|---|---|---|
| १ | पात्र दिव्यांग व्यक्ती असल्याचा पुरावा (लागू असेल त्याप्रमाणे) | PDF | ५० | ५०० |
| २ | खेळाडूसाठीच्या आरक्षणाकरीता पात्र असल्याचा पुरावा (लागू असेल त्याप्रमाणे) | PDF | ५० | ५०० |
| ३ | अनाथ आरक्षणासाठी पात्र असल्याचा पुरावा (लागू असेल त्याप्रमाणे) | PDF | ५० | ५०० |
| ४ | खेळाडू, दिव्यांग अथवा अनाथ आरक्षणाचा दावा असल्यास अधिवास प्रमाणपत्र | PDF | ५० | ५०० |

**(तीन)** उपरोक्त प्रमाणपत्र/कागदपत्रे आयोगाच्या संकेतस्थळावरील 'उमेदवारांना सर्वसाधारण सूचना' प्रकरण क्रमांक चार तसेच प्रस्तुत जाहिरातीमध्ये नमूद केल्याप्रमाणे असणे अनिवार्य आहे.

**(चार)** खेळाडू, दिव्यांग व अनाथ आरक्षणाच्या दाव्यांच्या अनुषंगाने प्रमाणपत्रे/कागदपत्रे अपलोड केल्याशिवाय अर्ज सादर करता येणार नाही.

**१०.३ सर्वसाधारण :-**

**(एक)** अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्वीकारण्यात येतील.

**(दोन)** अर्ज सादर करण्याकरीता संकेतस्थळ :- https://mpsconline.gov.in

**(तीन)** ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mpsconline.gov.in तसेच https://mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

**(चार)** आयोगास अर्ज सादर केल्यानंतर विहित मुदतीत परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

**१०.४ अर्ज सादर करण्याचा कालावधी**:- **दिनांक २९ ऑक्टोबर, २०२१ रोजी १४.०० वाजल्यापासून दिनांक १९ नोव्हेंबर, २०२१ रोजी २३.५९ वाजेपर्यंत.**

**१०.५ शुल्क (रुपये) :-**

**(एक)** अमागास - **रु. ३९४/-**

**(दोन)** मागासवर्गीय/आ.दु.घ./अनाथ - **रु. २९४/-**

**(तीन)** उपरोक्त परीक्षा शुल्काव्यतिरिक्त बँक चार्जेस तसेच त्यावरील देय कर अतिरिक्त असतील.

**(चार)** परीक्षा शुल्क ना-परतावा (Non-refundable) आहे.

१०.६ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरीता खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा:-

**(एक)** शुल्क भरण्याकरीता मुख पृष्ठावरील 'माझे खाते' या लिंक वर क्लिक करावे.

**(दोन)**'माझे खाते' या लिंक वर क्लिक केल्यानंतर अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या / न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. 'Unpaid' लिहिलेल्या जाहिरात/ पद / परीक्षेसमोर ' Pay Now' अशी लिंक उपलब्ध असेल.

**(तीन)**'Pay Now' या लिंक वर क्लिक केल्यानंतर दोन पर्याय उपलब्ध होतील:- (१) ऑनलाईन पेमेंट (२) चलनाद्वारे

**(चार)** क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड, युपीआय अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन परीक्षा शुल्क अदा करता येईल.

**(पाच)** ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा झाला आहे किंवा कसे याची स्थिती (status) लगेचच अवगत होईल. ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्क भरले असल्याबाबत Logout करण्यापूर्वीच खात्री करणे अथवा परीक्षा शुल्काचा भरणा झाल्याबाबतची स्थिती उपलब्ध नसल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याबाबतची कार्यवाही प्रस्तुत परीक्षेच्या अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वीच करणे आवश्यक आहे.

**(सहा)** ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा करताना बँकेकडून व्यवहार (Transaction) पूर्ण झाला असल्याबाबत खात्री करण्याची जबाबदारी उमेदवाराची आहे. कोणत्याही कारणास्तव व्यवहार अयशस्वी ठरल्यास यासंदर्भातील तक्रारीची आयोगाकडून दखल घेतली जाणार नाही.

**(सात)** चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

**(आठ)** भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर केल्यास त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

**(नऊ)** **ऑनलाईन परीक्षा शुल्क भरणे तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेणे याकरीता विहित अंतिम दिनांक १९ नोव्हेंबर, २०२१ रोजी २३.५९ वाजेपर्यंत.**

**(दहा)** **चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये शुल्क भरण्याचा अंतिम दिनांक २० नोव्हेंबर, २०२१ - बँकेच्या कार्यालयीन वेळेत.**

**१०.७ जिल्हा केंद्र निवड :-**

**(एक)** अर्ज सादर करतानाच जिल्हा केंद्राची निवड करणे आवश्यक आहे.

**(दोन)** जिल्हा केंद्र बदलाबाबतची विनंती कोणत्याही परिस्थितीत अथवा कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही

**(तीन)** एखादे जिल्हा केंद्र कार्यान्वित होऊ शकले नाही अथवा एखाद्या जिल्हा केंद्रांवर उमेदवारांना प्रवेश देण्याची क्षमता ओलांडली गेली तर ते जिल्हाकेंद्र निवडलेल्या उमेदवारांची बैठक व्यवस्था जवळच्या दुस-या जिल्हा केंद्रावर करण्यात येईल.

**(चार)** एकदा निवडलेल्या जिल्हा केंद्रामध्ये अथवा आयोगाने निश्चित केलेल्या परीक्षा उपकेंद्रामध्ये बदल करण्याची विनंती कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही.

**(पाच)**वरीलप्रमाणे जिल्हा केंद्रनिवडीची प्रक्रिया पूर्ण न केल्यास उमेदवाराने अर्जामध्ये दिलेल्या कायमस्वरुपी रहिवासाच्या पत्त्याच्याआधारे संबंधित महसुली मुख्यालयाच्या जिल्हाकेंद्रावर किंवा नजिकच्या जिल्हाकेंद्रावर प्रवेश देण्यात येईल. याबाबत आयोगाचे त्या त्या वेळचे धोरण व आयोगाचा निर्णय अंतिम मानण्यात येईल.

**११. दिव्यांग उमेदवार :- लेखनिक व अनुग्रह कालावधीबाबत**

**११.१** लक्षणीय दिव्यांगत्व असलेल्या उमेदवारांना परीक्षेच्यावेळी लेखनिक व इतर सोयी सवलती उपलब्ध करून देण्यासंदर्भात शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : दिव्यांग२०१९/प्र.क्र.२००//दि.क.२, दिनांक ०५ ऑक्टोबर, २०२१ अन्वये जारी करण्यात आलेल्या **' लक्षणीय (Benchmark)दिव्यांग व्यक्तींच्याबाबत लेखी परीक्षा घेण्याबाबतची मार्गदर्शिका-२०२१'** तसेच तदनंतर शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**११.२** प्रत्यक्ष परीक्षेच्यावेळी उत्तरे लिहिण्यासाठी सक्षम नसलेल्या, पात्र दिव्यांग उमेदवारांना, लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीची आवश्यकता असल्यास संबंधित उमेदवाराने ऑनलाईन पध्दतीने आयोगास अर्ज सादर केल्याच्या दिनांकापासून सात (७) दिवसाच्या आत आवश्यक प्रमाणपत्र/कागदपत्रांसह विहित नमुन्यामध्ये आयोगाकडे लेखी विनंती करुन पूर्व परवानगी घेणे आवश्यक आहे.

**११.३** लेखनिकाची व्यवस्था उमेदवारांकडून स्वत: केली जाणार आहे की आयोगाच्या कार्यालयामार्फत लेखनिकाची व्यवस्था करावी लागणार आहे, याचा स्पष्ट उल्लेख जाहिरातीस अनुसरुन ऑनलाईन पध्दतीने केलेल्या अर्जामध्ये असल्यासच विहित नमुन्याद्वारे प्राप्त लेखी विनंतीचा विचार केला जाईल.

**११.४** अर्जामध्ये मागणी केली नसल्यास तसेच आयोगाची विहित पध्दतीने पूर्व परवानगी घेतली नसल्यास ऐनवेळी लेखनिकाची मदत घेता येणार नाही अथवा अनुग्रह कालावधी अनुज्ञेय असणार नाही.

**११.५** परीक्षेकरीता लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीची परवानगी दिलेल्या पात्र उमेदवारांची यादी आयोगाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीच्या परवानगीबाबत संबंधित उमेदवाराला आयोगाकडील नोंदणीकृत ई-मेलवर कळविण्यात येईल.

**११.६** प्रत्यक्ष परीक्षेच्यावेळी लेखनिक व अनुग्रह कालावधीचा लाभ घेण्यास इच्छुक असलेल्या दिव्यांग उमेदवारांनी आयोगामार्फत प्रसिद्ध करण्यात आलेल्या जाहिरातीस अनुसरून अर्ज सादर करण्यापूर्वी आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आलेल्या " **दिव्यांग उमेदवारांकरीता मार्गदर्शक सूचना** " चे अवलोकन करणे उमेदवारांचे हिताचे राहील.

**१२. सेवाप्रवेशोत्तर शर्ती :-**

**१२.१** नियुक्त झालेल्या व्यक्तीस खालील अर्हता/परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील :-

**(एक)** जेथे प्रचलित नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा विहित केली असेल अथवा आवश्यक असेल तेथे त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा

**(दोन)** हिंदी आणि मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर ती व्यक्ती अगोदर परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा

**(तीन)**शासन निर्णय, माहिती तंत्रज्ञान(सा.प्र.वि.), क्रमांक: मातंसं-२०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ०४ फेब्रुवारी, २०१३, शासन पूरकपत्र, क्रमांक मातंसं-२०१२/प्रक्र.२७७/३९, दिनांक ०८ जानेवारी, २०१८ व १६ जुलै, २०२१ अथवा महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने यासंदर्भात वेळोवेळी विहित केलेली संगणक हाताळणीबाबतची प्रमाणपत्र परीक्षा

**१२.२** राज्य कर निरीक्षक व पोलीस उपनिरीक्षक संवर्गातील भरतीकरीता "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१" तसेच तद्नंतर यासंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**१३. प्रवेशप्रमाणपत्र** :-

**१३.१** परीक्षेस प्रवेश दिलेल्या उमेदवारांची प्रवेशप्रमाणपत्रे आयोगाच्या ऑनलाईन अर्जप्रणालीच्या संकेतस्थळावर (https://mpsconline.gov.in) उमेदवारांच्या प्रोफाईलद्वारे परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे **७** दिवस अगोदर उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

**१३.२** परीक्षेच्या वेळी उमेदवाराने स्वत:चे प्रवेशप्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१३.३** प्रवेश प्रमाणपत्र उपलब्ध करून देण्यात आल्यानंतर उमेदवाराला त्याच्या आयोगाकडील नोंदणीकृत मोबाईल क्रमांकावर लघुसंदेशाद्वारे कळविण्यात येईल. याबाबतची घोषणा आयोगाच्या संकेतस्थळावर परीक्षेपूर्वी एक सप्ताह अगोदर प्रसिद्ध करण्यात येईल.

**१३.४** परीक्षेच्या दिनांकापूर्वी ३ दिवस अगोदर प्रवेश प्रमाणपत्र प्राप्त न झाल्यास अर्ज सादर केल्याच्या आवश्यक पुराव्यासह आयोगाच्या कार्यालयाकडे संपर्क साधावा.

**१३.५** परीक्षेच्यावेळी स्वत:च्या ओळखीच्या पुराव्यासाठी स्वत:चे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा फक्त स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान कोणतेही **एक मूळ ओळखपत्र** तसेच मूळ ओळखपत्राची छायांकित प्रत सोबत आणणे अनिवार्य आहे.

**१३.६** आधार कार्डच्या ऐवजी भारतीय विशिष्ट ओळख प्राधिकरण (UIDAI) च्या संकेतस्थळावरुन डाऊनलोड केलेले ई-आधार सादर करणा-या उमेदवारांच्या बाबतीत ई-आधार वर उमेदवाराचे नाव, पत्ता, लिंग, फोटो, जन्मदिनांक या तपशीलासह आधार निर्मितीचा दिनांक (Date of Aadhaar generation) व आधार डाऊनलोड केल्याचा दिनांक असल्यासच तसेच सुस्पष्ट फोटोसह **रंगीत प्रिंट** मध्ये आधार डाऊनलोड केले असल्यासच ई-आधार वैध मानण्यात येईल.

**१३.७** नावांमध्ये बदल केलेला असल्यास विवाह निबंधक यांनी दिलेला दाखला (विवाहित स्त्रियांच्या बाबतीत), नावांत बदल झाल्यासंबंधी अधिसूचित केलेले राजपत्र किंवा राजपत्रित अधिकारी यांच्याकडून नावांत बदल झाल्यासंबंधीचा दाखला व त्याची छायांकित प्रत परीक्षेच्यावेळी सादर करणे आवश्यक आहे.

**१४. परीक्षेस प्रवेश**

**१४.१ फक्त पेन, पेन्सिल, प्रवेशप्रमाणपत्र, ओळखीचा मूळ पुरावा व ओळखीच्या पुराव्याची सुस्पष्ट छायांकित प्रत अथवा प्रवेश प्रमाणपत्रावरील सूचनेनुसार आयोगाने परवानगी दिलेल्या साहित्यासह उमेदवाराला परीक्षा कक्षात प्रवेश देण्यात येईल.**

**१४.२** स्मार्ट वॉच, डिजीटल वॉच, मायक्रोफोन, मोबाईल फोन, कॅमेरा अंतर्भूत असलेली कोणत्याही प्रकारची साधने, सिमकार्ड, ब्लू टूथ, दूरसंचार साधने म्हणून वापरण्या योग्य कोणतीही वस्तू, इलेक्ट्रॉनिक उपकरणे, वहया, नोटस, परवानगी नसलेली पुस्तके, बॅग्ज, परिगणक (calculator) इत्यादी प्रकारची साधने/ साहित्य परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच परीक्षा कक्षात आणण्यास, स्वत:जवळ बाळगण्यास, त्याचा वापर करण्यास अथवा त्याच्या वापरासाठी इतरांची मदत घेण्यास सक्त मनाई आहे. असे साहित्य आणल्यास ते परीक्षा केंद्राबाहेर ठेवण्याची व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील.

**१४.३** आयोगाने परवानगी नाकारलेले कोणत्याही प्रकारचे अनधिकृत साधन/साहित्य परीक्षेच्यावेळी संबंधित उपकेंद्राच्या मुख्य प्रवेशद्वारावरच ठेवावे लागेल. अशा साधन/साहित्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या नुकसानीस आयोग, जिल्हा प्रशासन किंवा संबंधित शाळा/महाविद्यालय व्यवस्थापन जबाबदार राहणार नाही.

**१५.** प्रस्तुत जाहिरातीमध्ये परीक्षेसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज स्वीकारण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क, निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया, परीक्षा योजना, अभ्यासक्रम इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या https://mpsc.gov.in या संकेतस्थळावरील स्पर्धा परीक्षेअंतर्गत '**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना**' तसेच "**परीक्षा योजना**" विभागातील **'महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब संयुक्त पूर्व परीक्षा** ' मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व अधिसूचना अधिकृत समजण्यात येईल.

**१६.** सदर जाहिरात आयोगाच्या https://mpsc.gov.in तसेच https://mpsconline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

ठिकाण : मुंबई.
दिनांक **: २८ ऑक्टोबर, २०२१**

सह सचिव, जाहिरात
महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

(१) आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात, तसेच, शारीरिक चाचणी व मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन, अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक साधने आणण्यास व वापरण्यास सक्त मनाई आहे. (२) प्रमाणपत्र तपासणीच्या वेळी पात्रतेसंदर्भातील सर्व मूळ प्रमाणपत्रे सादर न केल्यास शिफारस/नियुक्तीसाठी विचार करण्यात येणार नाही.



महाराष्ट्र शासन

# महाराष्ट्र लोकसेवा आयोग

मुख्य कार्यालय : ५, ७, ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई - ४०००२१ ☎२२७९५९००
फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा मजला, फोर्ट, मुंबई-४००००१ ☎२२१०२२२२
Email ID : contact-secretary@mpsc.gov.in
Website : https://mpsc.gov.in , https://mpsconline.gov.in

क्रमांक : एनओटी-३६१७/सीआर-२४/२०२०/जाहिरात

जाहिरात क्रमांक : ४९/२०२२ ते ५१/२०२२

## महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब मुख्य परीक्षा - २०२१

जाहिरात क्रमांक २४९/२०२१ दिनांक २३ ऑक्टोबर, २०२१ नुसार आयोगामार्फत दिनांक २६ फेब्रुवारी, २०२२ रोजी घेण्यात आलेल्या महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब संयुक्त पूर्व परीक्षा - २०२१ मधून भरावयाच्या सहायक कक्ष अधिकारी, राज्य कर निरीक्षक तसेच पोलीस उप निरीक्षक संवर्गाच्या अनुक्रमे दिनांक ०१ जून, २०२२ व ०२ जून, २०२२ रोजी जाहीर करण्यात आलेल्या निकालाआधारे संबंधित संवर्गाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांकरीता मुख्य परीक्षा खालीलप्रमाणे घेण्यात येतील :-

| अ. क्र. | जाहिरात क्रमांक | परीक्षा | वार व दिनांक | जिल्हा केंद्र |
|---|---|---|---|---|
| १ | -- | महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षा - २०२१ संयुक्त पेपर क्रमांक १ | शनिवार , दिनांक ०९ जुलै, २०२२ | अमरावती, औरंगाबाद, नागपूर, नाशिक, मुंबई व पुणे |
| २ | **४९ /२०२२** | महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षा - २०२१ पेपर क्रमांक २ पोलीस उप निरीक्षक | रविवार , दिनांक १७ जुलै, २०२२ | अमरावती, औरंगाबाद, नागपूर, नाशिक, मुंबई व पुणे |
| ३ | **५०/२०२२** | महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षा - २०२१ पेपर क्रमांक २ राज्य कर निरीक्षक | रविवार, दिनांक २४ जुलै, २०२२ | अमरावती, औरंगाबाद, नागपूर, नाशिक, मुंबई व पुणे |
| ४ | **५१ /२०२२** | महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षा - २०२१ पेपर क्रमांक २ सहायक कक्ष अधिकारी | रविवार, दिनांक ३१ जुलै, २०२२ | अमरावती, औरंगाबाद, नागपूर, नाशिक, मुंबई व पुणे |

**२.** विषयांकित परीक्षेमधून भरण्यात येणा-या विविध संवर्गातील एकूण **१०८५** पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| प्रवर्ग | अ.जा. | अ.ज. | वि.जा. (अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | वि.मा.प्र. | इ.मा.व. | आ.दु.घ. | एकूण आरक्षित पदे | अराखीव (खुला) | एकूण पदे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **१.१ सामान्य प्रशासन विभाग :-** | | | | | | | | | | | | |
| **सहायक कक्ष अधिकारी, गट-ब (अराजपत्रित) (एकूण १०० पदे)** | | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | १७ | ९ | २ | १ | ४ | -- | -- | १८ | १० | ६१ | ३९ | १०० |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :- | | | | | | | | | | | | |
| सर्वसाधारण | ११ | ६ | १ | १ | ३ | -- | -- | १२ | ६ | ४० | २५ | ६५ |
| महिला (३०%) | ५ | ३ | १ | -- | १ | -- | -- | ५ | ३ | १८ | १२ | ३० |
| खेळाडू (५%) | १ | -- | -- | -- | -- | -- | -- | १ | १ | ३ | २ | ५ |
| दिव्यांग (४%) | स्वमग्नता(Autism)/मंदबुद्धि किंवा आकलन क्षमतेची कमतरता(Intellectual Disability)/विशिष्ट शिक्षण अक्षमता(Specific Learning Disability)/मानसिक आजार (Mental Illeness) किंवा बहिरेपणा व अंधत्वासह एका पेक्षा जास्त प्रकारचे दिव्यांगत्व- **एकूण ४ पदे** | | | | | | | | | | | |
| अनाथ (१%) | **एकूण १ पद** | | | | | | | | | | | |
| **१.२ वित्त विभाग :-** | | | | | | | | | | | | |
| **राज्य कर निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित) (एकूण ६०९ पदे)** | | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | ८० | ४२ | १५ | १४ | २४ | ०९ | १० | ११० | ६१ | ३६५ | २४४ | ६०९ |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :- | | | | | | | | | | | | |
| सर्वसाधारण | ५३ | २७ | १० | ०९ | १६ | ०६ | ०७ | ७१ | ३९ | २३८ | १५८ | ३९६ |
| महिला (३०%) | २३ | १३ | ०४ | ०४ | ०७ | ०३ | ०३ | ३३ | १९ | १०९ | ७४ | १८३ |
| खेळाडू (५%) | ०४ | ०२ | ०१ | ०१ | ०१ | -- | -- | ०६ | ०३ | १८ | १२ | ३० |
| दिव्यांग (४%) | (१) अंध(B)/अल्पदृष्टी (LV)-७ पदे (२) कर्णबधिरता(D) अथवा ऐकु येण्यातील दुर्बलता(HH)- ६ पदे, (३) अस्थीव्यंगता/ मेंदुचा पक्षाघात(Cerebral Palsy)/कुष्ठरोग मुक्त(Leprocy Cured) / शारीरिक वाढ खुंटणे(Dwarfism)/आम्ल हल्लाग्रस्त(Acid Attack Victim)/स्नायु विकृती(Muscular Dystophy) - ६ पदे (४) स्वमग्नता(Autism)/मंदबुद्धि किंवा आकलन क्षमतेची कमतरता(Intellectual Disability)/विशिष्ट शिक्षण अक्षमता(Specific Learning Disability)/मानसिक आजार (Mental Illeness) किंवा बहिरेपणा व अंधत्वासह एका पेक्षा जास्त प्रकारचे दिव्यांगत्व- ६ पदे **- एकूण २५ पदे** | | | | | | | | | | | |
| अनाथ (१%) | **एकूण ६ पदे** | | | | | | | | | | | |

| | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **१.३ गृह विभाग :-** | | | | | | | | | | | | |
| **पोलीस उप निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित (एकूण ३७६ पदे)** | | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | ७६ | ३९ | ११ | ८ | २७ | १८ | १३ | ५३ | ३७ | २८२ | ९४ | ३७६ |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :- | | | | | | | | | | | | |
| सर्वसाधारण | ४९ | २५ | ७ | ६ | १८ | १२ | ८ | ३४ | २४ | १८३ | ६१ | २४४ |
| महिला (३०%) | २३ | १२ | ३ | २ | ८ | ५ | ४ | १६ | ११ | ८४ | २८ | ११२ |
| खेळाडू (५%) | ४ | २ | १ | -- | १ | १ | १ | ३ | २ | १५ | ५ | २० |
| दिव्यांग (४%) | -- | | | | | | | | | | | |
| अनाथ (१%) | **एकूण ४ पदे** | | | | | | | | | | | |

## ३. पदसंख्या व आरक्षणासंदर्भात सर्वसाधारण तरतुदी :-

**३.१** भरावयाच्या उपरोक्त संवर्ग/पदांचा सामाजिक/समांतर आरक्षणाबाबतचा तपशील शासनाच्या मागणीपत्रानुसार आहे. तसेच, वर नमूद केलेल्या पदसंख्या व आरक्षणामध्ये शासनाच्या सूचनेनुसार बदल होण्याची शक्यता आहे.

**३.२** शासनाकडून पदसंख्या व आरक्षणामध्ये बदल प्राप्त झाल्यास याबाबतची माहिती/ बदल वेळोवेळी आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात येईल व त्यानुसार भरती प्रक्रिया राबविण्यात येईल.

**३.३** विविध सामाजिक प्रवर्ग, महिला, प्राविण्यप्राप्त खेळाडू, अनाथ इत्यादींसाठी सामाजिक व समांतर आरक्षण शासनाकडून वेळोवळी जारी करण्यात येणाऱ्या आदेशानुसार राहील

**३.४** महिलांसाठी आरक्षित पदांकरिता दावा करणा-या उमेदवारांनी महिला आरक्षणाचा लाभ घ्यावयाचा असल्यास त्यांनी अर्जामध्ये न चुकता महाराष्ट्राचे अधिवासी (Domiciled) असल्याबाबत तसेच नॉन क्रीमीलेअर मध्ये मोडत असल्याबाबत (अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती वगळून) स्पष्टपणे दावा करणे आवश्यक आहे.

**३.५** विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती. (ब), भटक्या जमाती (क) व भटक्या जमाती (ड) प्रवर्गासाठी आरक्षित असलेली पदे आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदासाठी संबंधित प्रवर्गातील योग्य व पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास अद्ययावत शासन धोरणाप्रमाणे उपलब्ध प्रवर्गातील उमेदवाराचा विचार गुणवत्तेच्या आधारावर करण्यात येईल.

**३.६** अर्ज करताना एखादी जात/जमात राज्य शासनाकडून आरक्षणासाठी पात्र असल्याचे घोषित केली असल्यासच तसेच सक्षम प्राधिकाऱ्याने प्रदान केलेले प्रमाणपत्र उमेदवाराकडे उपलब्ध असेल तर संबंधित जात/जमातीचे उमेदवार आरक्षणाच्या दाव्यासाठी पात्र असतील.

**३.७** समांतर आरक्षणाबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०१२/प्र.क्र.१६/१२/१६-अ, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ तसेच शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक संकीर्ण-१११८/प्र.क्र.३९/१६-अ, दिनांक १९ डिसेंबर, २०१८ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**३.८** आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांतील (ईडब्लूएस) उमेदवारांकरीता शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :राआधो-४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१९ व दिनांक ३१ मे, २०२१ अन्वये विहित करण्यात आलेले प्रमाणपत्र, कागदपत्र पडताळणीच्या वेळी सादर करणे आवश्यक राहील.

**३.९** शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:सीबीसी-२०१२/प्र.क्र.१८२/विजाभज-१, दिनांक २५ मार्च, २०१३ अन्वये विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीनुसार अद्ययावत नॉन क्रिमीलेयर प्रमाणपत्र/आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील असल्याबाबतचा पुरावा म्हणून सक्षम प्राधिकाऱ्याने वितरित केलेले व पूर्व परीक्षेकरीता अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास वैध असणारे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

**३.१०** सेवा प्रवेशाच्या प्रयोजनासाठी शासनाने मागास म्हणून मान्यता दिलेल्या समाजाच्या वयोमर्यादेमध्ये सवलत घेतलेल्या उमेदवारांचा अराखीव (खुला) पदावरील निवडीकरीता विचार करणेबाबत शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करण्यात येईल. याबाबतचा तपशील वेळोवेळी आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात येईल.

**३.११** अराखीव (खुला) उमेदवारांकरीता विहित केलेल्या वयोमर्यादा तसेच इतर पात्रता विषयक निकषासंदर्भातील अटींची पुर्तता करणा-या सर्व उमेदवारांचा (मागासवर्गीय उमेदवारांसह) अराखीव (खुला) सर्वसाधारण पदावरील शिफारशीकरीता विचार होत असल्याने, सर्व आरक्षित प्रवर्गातील उमेदवारांनी त्यांच्या प्रवर्गासाठी पद आरक्षित/उपलब्ध नसले तरी, अर्जामध्ये त्यांच्या मूळ प्रवर्गासंदर्भातील माहिती अचूकपणे नमूद करणे बंधनकारक आहे.

**३.१२** कोणत्याही प्रकारच्या आरक्षणाचा लाभ हा केवळ महाराष्ट्राचे सर्वसाधारण रहिवासी असणाऱ्या उमेदवारांना अनुज्ञेय आहे. सर्वसाधारण रहिवासी या संज्ञेला भारतीय लोकप्रतिनिधित्व कायदा १९५० च्या कलम २० अनुसार जो अर्थ आहे तोच अर्थ असेल.

**३.१३** सामाजिक अथवा समांतर आरक्षणाचा अथवा सोयी सवलतींचा दावा करणा-या उमेदवाराकडे संबंधित कायदा / नियम / आदेशानुसार विहित नमुन्यातील पूर्व जाहिरातीस अनुसरुन अर्ज स्वीकारण्यासाठी विहित केलेल्या दिनांकापूर्वीचे वैध प्रमाणपत्र उपलब्ध असणे अनिवार्य आहे.

**३.१४** सामाजिक व समांतर आरक्षणासंदर्भात विविध न्यायालयामध्ये दाखल न्यायप्रविष्ट प्रकरणी अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदभरतीची कार्यवाही करण्यात येईल.

### ३.१५ खेळाडू आरक्षण :-

**३.१५.१** शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १ जुलै, २०१६, तसेच शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८ ऑगस्ट, २०१६, शुध्दीपत्रक क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ११ मार्च, २०१९ व शासन शुद्धिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक २४ ऑक्टोबर, २०१९ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणासंदर्भात तसेच वयोमर्यादेतील सवलतीसंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

**३.१५.२** प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणाचा दावा करणा-या उमेदवारांच्या बाबतीत क्रीडा विषयक विहित अर्हता धारण करीत असल्याबाबत सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले पात्र खेळाचे प्राविण्य प्रमाणपत्र पूर्व परीक्षेस अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकाचे किंवा तत्पूर्वीचे असणे बंधनकारक आहे.

**३.१५.३** खेळाचे प्राविण्य प्रमाणपत्र योग्य दर्जाचे असल्याबाबत तसेच तो खेळाडू उमेदवार खेळाडूसाठी आरक्षित पदावरील निवडीकरीता पात्र ठरतो, याविषयीच्या पडताळणीकरीता त्यांचे प्राविण्य प्रमाणपत्र संबंधित विभागीय उपसंचालक कार्यालयाकडे पूर्व परीक्षेस अर्ज सादर करण्याच्या दिनांकापूर्वीच सादर केलेले असणे बंधनकारक आहे. अन्यथा प्राविण्य प्राप्त खेळाडूसाठी आरक्षणाकरीता पात्र समजण्यात येणार नाही.

**३.१५.४** कागदपत्रे पडताळणी/मुलाखतीच्यावेळी खेळाडू उमेदवारांनी विहित अर्हता धारण करीत असल्याबाबत सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले प्राविण्य प्रमाणपत्र तसेच त्यांचे प्राविण्य प्रमाणपत्र योग्य असल्याबाबत तसेच खेळाडू कोणत्या संवर्गातील खेळाडूसाठी आरक्षित पदावरील निवडीकरीता पात्र ठरतो, याविषयीचा सक्षम प्राधिका-याने प्रदान केलेले प्राविण्य प्रमाणपत्र पडताळणीबाबतचा अहवाल सादर केला तरच उमेदवारांचा संबंधित संवर्गातील खेळाडूसाठी आरक्षित पदावर शिफारशी/नियुक्तीकरीता विचार करण्यात येईल.

**३.१५.५** एकापेक्षा जास्त खेळांची प्राविण्य प्रमाणपत्रे असणा-या खेळाडू उमेदवाराने एकाच वेळेस सर्व खेळांची प्राविण्य प्रमाणपत्रे प्रमाणित करण्याकरीता संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांकडे सादर करणे बंधनकारक आहे.

**३.१६ दिव्यांग आरक्षण :-**

**३.१६.१** दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ च्या आधारे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक दिव्यांग २०१८/प्र.क्र.११४/१६ अ, दिनांक २९ मे, २०१९ तसेच यासंदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार दिव्यांग व्यक्तींच्या आरक्षणासंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

**३.१६.२** प्रस्तुत परीक्षेमधून भरण्यात येणा-या संवर्ग/पदांच्या बाबतीत खालील पदांसमोर दर्शविलेल्या शारीरिक पात्रतेचे निकष धारण करणारे उमेदवार संबंधित पदावर नियुक्तीसाठी पात्र अथवा अपात्र असतील :-

| अ.क्र. | पदाचे नांव | **शासन आदेश** | **दिव्यांगत्वाचा प्रकार** |
|---|---|---|---|
| **१** | सहायक कक्ष अधिकारी | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: कअस-१३१९/ प्र.क्र.७४/१४-ब, दिनांक २६ फेब्रुवारी, २०२१ | (1) B, LV<br>(2) D, HH,<br>(3) OA, BA, OL, BL, OAL, CP, LC, DW, AAV,<br>(4) SLD, MI<br>(5) MD involving (1) to (4) above |
| **२** | राज्य कर निरीक्षक | शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विकवि-१०२१/ प्र.क्र.१३/ वि.प्र.-४, दिनांक २५ फेब्रुवारी, २०२१ | (1) B, LV<br>(2) D, HH,<br>(3) OA, BA, OL, BL, OAL, CP, LC, DW, AAV,<br>(4) SLD, MI<br>(5) MD involving (1) to (4) above |
| **३** | पोलीस उपनिरीक्षक | शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक : पोलीस-१८२१/प्र.क्र.५२/ पोल-५अ, दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१ | दिव्यांग उमेदवार पात्र नाही. |

**३.१६.३** दिव्यांग व्यक्तींसाठी असलेली पदे भरावयाच्या एकूण पदसंख्येपैकी असतील.

**३.१६.४** दिव्यांग व्यक्तींची संबंधित संवर्ग/पदाकरीता पात्रता शासनानाकडून वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

**३.१६.५** दिव्यांग व्यक्तींसाठी आरक्षित पदांवर शिफारस करताना उमेदवार कोणत्या सामाजिक प्रवर्गातील आहे, याचा विचार न करता दिव्यांग गुणवत्ता क्रमांकानुसार त्यांची शिफारस करण्यात येईल.

**३.१६.६** संबंधित दिव्यांगत्वाच्या प्रकारचे किमान ४०% दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र धारक उमेदवार / व्यक्ती आरक्षण तसेच नियमानुसार अनुज्ञेय सोयी / सवलतीसाठी पात्र असतील.

**३.१६.७** लक्षणीय दिव्यांगत्व असलेले उमेदवार / व्यक्ती खालील सवलतींच्या दाव्यास पात्र असतील:-

(१) दिव्यांगत्वाचे प्रमाण किमान ४०% अथवा त्यापेक्षा जास्त असल्यास तसेच पद लक्षणीय दिव्यांग व्यक्तींसाठी आरक्षित असल्यास नियमानुसार अनुज्ञेय आरक्षण व इतर सोयी सवलती

(२) दिव्यांगत्वाचे प्रमाण किमान ४०% अथवा त्यापेक्षा जास्त असल्यास तसेच पद संबंधित दिव्यांग प्रकारासाठी सुनिश्चित केले असल्यास नियमानुसार अनुज्ञेय सायी सवलती

**३.१६.८** दिव्यांग व्यक्तींसाठी असलेल्या वयोमर्यादेचा अथवा इतर कोणत्याही प्रकारचा फायदा घेऊ इच्छिणा-या उमेदवारांनी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक अप्रकि-२०१८/प्र.क्र.४६/आरोग्य-६, दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ मधील आदेशानुसार केंद्र शासनाच्या www.swavlambancard.gov.in अथवा SADM या संगणकीय प्रणालीदवारे वितरित करण्यात आलेले नवीन नमुन्यातील दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे.

**३.१७. दिव्यांग उमेदवार :- लेखनिक व अनुग्रह कालावधीबाबत**

**३.१७.१** लक्षणीय दिव्यांगत्व असलेल्या उमेदवारांना परीक्षेच्यावेळी लेखनिक व इतर सोयी सवलती उपलब्ध करून देण्यासंदर्भात शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : दिव्यांग२०१९/प्र.क्र.२००//दि.क.२, दिनांक ०५ ऑक्टोबर, २०२१ अन्वये जारी करण्यात आलेल्या ' **लक्षणीय (Benchmark)दिव्यांग व्यक्तींच्याबाबत लेखी परीक्षा घेण्याबाबतची मार्गदर्शिका-२०२१**' तसेच तदनंतर शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**३.१७.२** लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीसाठी केवळ अर्जाद्वारे दावा केला म्हणून सवलत अनुज्ञेय असणार नाही.

**३.१७.३** प्रत्यक्ष परीक्षेच्यावेळी उत्तरे लिहिण्यासाठी सक्षम नसलेल्या, पात्र दिव्यांग उमेदवारांना, लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीची आवश्यकता असल्यास संबंधित उमेदवाराने ऑनलाईन पध्दतीने आयोगास अर्ज सादर केल्याच्या दिनांकापासून सात (७) दिवसाच्या आत आवश्यक प्रमाणपत्र/कागदपत्रांसह विहित नमुन्यामध्ये आयोगाकडे लेखी विनंती करुन पूर्व परवानगी घेणे आवश्यक आहे.

**३.१७.४** लेखनिकाची व्यवस्था उमेदवारांकडून स्वत: केली जाणार आहे की आयोगाच्या कार्यालयामार्फत लेखनिकाची व्यवस्था करावी लागणार आहे, याचा स्पष्ट उल्लेख जाहिरातीस अनुसरुन ऑनलाईन पध्दतीने केलेल्या अर्जामध्ये असल्यासच विहित नमुन्याद्वारे प्राप्त लेखी विनंतीचा विचार केला जाईल.

**३.१७.५** अर्जामध्ये मागणी केली नसल्यास तसेच आयोगाची विहित पध्दतीने पूर्व परवानगी घेतली नसल्यास ऐनवेळी लेखनिकाची मदत घेता येणार नाही अथवा अनुग्रह कालावधी अनुज्ञेय असणार नाही.

**३.१७.६** परीक्षेकरीता लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीची परवानगी दिलेल्या पात्र उमेदवारांची यादी आयोगाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीच्या परवानगीबाबत संबंधित उमेदवाराला आयोगाकडील नोंदणीकृत ई-मेलवर कळविण्यात येईल.

**३.१७.७** प्रत्यक्ष परीक्षेच्यावेळी लेखनिक व अनुग्रह कालावधीचा लाभ घेण्यास इच्छुक असलेल्या दिव्यांग उमेदवारांनी आयोगामार्फत प्रसिद्ध करण्यात आलेल्या जाहिरातीस अनुसरून अर्ज सादर करण्यापूर्वी आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आलेल्या " **दिव्यांग उमेदवारांकरीता मार्गदर्शक सूचना** " चे अवलोकन करणे उमेदवारांचे हिताचे राहील.

**३.१८ अनाथ आरक्षण :-**

**३.१८.१** अनाथ व्यक्तींचे आरक्षण शासन निर्णय, महिला व बालविकास विभाग, क्रमांक : अनाथ-२०१८/प्र.क्र.१८२/का-०३, दिनांक २३ ऑगस्ट, २०२१ तसेच यासंदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात येणा-या आदेशानुसार राहील.

**३.१८.२** अनाथांसाठी आरक्षित पदावर गुणवत्तेनुसार निवड झालेल्या उमेदवारांचा समावेश उमेदवार ज्या सामाजिक प्रवर्गाचा आहे; त्या प्रवर्गातून करण्यात येईल.

**३.१८.३** पूर्व परीक्षेच्या अर्जाद्वारे अनाथ आरक्षणाचा दावा केलेल्या उमेदवारांनी दिनांक २३ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीनुसार सुधारित नमुन्यातील अनाथ प्रमाणपत्र व महाराष्ट्र राज्याचे अधिवास प्रमाणपत्र आयोगाकडून निश्चित करण्यात येणाऱ्या विहित कालावधीत सादर करणे आवश्यक राहील. अन्यथा अनाथ आरक्षणाचा दावा विचारात घेतला जाणार नाही.

**४. वेतनश्रेणी :-**

एस-१४, रुपये ३८६००-१२२८०० अधिक महागाई भत्ता व नियमाप्रमाणे देय इतर भत्ते.

**५. पात्रता :-**

**५.१** भारतीय नागरिकत्व

**५.२ वयोमर्यादा :-**

| अ. क्र. | संवर्ग | वयोमर्यादा गणण्याचा दिनांक | वय | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | किमान | कमाल | | प्राविण्य प्राप्त खेळाडू | | माजी सैनिक, आणिबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकारी | | दिव्यांग उमेदवार |
| | | | अमागास / मागासवर्गीय/ आ. दु. घ. | अमागास | मागासवर्गीय/ अनाथ/ आ. दु. घ. | अमागास | मागासवर्गीय / आ. दु. घ. | अमागास | मागासवर्गीय/ आ. दु. घ. | |
| १ | सहायक कक्ष अधिकारी | १ फेब्रुवारी, २०२२ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत |
| २ | राज्य कर निरीक्षक | १ जानेवारी, २०२२ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | १ फेब्रुवारी, २०२२ | १९ | ३१ | ३४ | ३६ | ३६ | ३६ | ३६ | अपात्र |

**५.३ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:- क्रमांक:एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.६१/कार्या-१२, दिनांक १७ डिसेंबर, २०२१ अनुसार दिनांक ०१ मार्च, २०२० ते १७ डिसेंबर, २०२१ या कालावधीत वयाधिक ठरणारे उमेदवार अर्ज करण्यास पात्र असतील.**

**५.४** विहित वयोमर्यादा इतर कोणत्याही बाबतीत शिथिल केली जाणार नाही.

**५.५ शैक्षणिक अर्हता :-**

**५.५.१** सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा तिच्याशी समतुल्य असणारी शासनाने घोषित केलेली इतर कोणतीही तत्सम अर्हता.

**५.५.२** पदवी परीक्षेच्या शेवटच्या वर्षास बसलेले उमेदवार पूर्व परीक्षेस तात्पुरते पात्र असतील, परंतु पूर्व परीक्षेच्या निकालाआधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरणा-या उमेदवारांनी मुख्य परीक्षेकरीता अर्ज स्वीकारण्यासाठी विहित केलेल्या अंतिम दिनांकापर्यंत पदवी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

**५.५.३** अंतर्वासिता (Internship) किंवा कार्यशाळेतील कामाचा अनुभव आवश्यक असेल अशा पदवीधारकाने ही अट मुख्य परीक्षेचे अर्ज स्वीकारण्याच्या विहित अंतिम दिनांकापर्यंत पूर्ण केली असली पाहीजे.

**५.५.४** मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.

**५.५.५ अर्हता/पात्रता गणण्याचा दिनांक :-** मुख्य परीक्षेकरीता अर्ज स्वीकारण्यासाठी विहित केलेल्या अंतिम दिनांकापर्यंत पदवी परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे

**५.६ शारीरिक अर्हता :-**

**५.६.१ पोलीस उपनिरीक्षक पदासाठी विकल्प नमूद करणा-या उमेदवारांकडे उपरोक्त अर्हतेसोबत खालीलप्रमाणे किमान शारीरिक अर्हता असणे आवश्यक आहे :-**

| पुरुष | महिला |
|---|---|
| (१) उंची - १६५ सें. मी. (अनवाणी) (कमीत कमी)<br>(२) छाती - न फुगविता ७९ से.मी.<br>फुगविण्याची क्षमता किमान ५ से.मी. आवश्यक | उंची - १५७ सें.मी. (अनवाणी) (कमीत कमी) |

**५.६.२** पोलीस उपनिरीक्षक पदावरील नियुक्तीकरीता शिफारस झालेल्या उमेदवारांची शारिरिक मोजमापे नियुक्ती करण्यापूर्वी शासनामार्फत सक्षम प्राधिका-याकडून तपासून घेण्यात येतील. वरीलप्रमाणे विहित शारीरिक पात्रता नसल्यास संबंधित उमेदवार नियुक्तीसाठी अपात्र ठरेल.

**६. निवडप्रकिया :-**

**६.१** जाहिरातीमध्ये नमूद अर्हता/पात्रतेविषयक अटी किमान असून किमान अर्हता धारण केली म्हणून उमेदवार मुलाखत/शिफारशीसाठी पात्र असणार नाही.

**६.२** सेवा भरतीची संपूर्ण प्रक्रिया खालील सेवा प्रवेश नियम अथवा तदनंतर शासनाकडून वेळोवेळी करण्यात येणा-या सुधारणा तसेच आयोगाकडून वेळोवेळी सुधारण्यात येणाऱ्या कार्यनियमावलीतील तरतुदींनुसार राबविण्यात येईल :-

(१) सहायक कक्ष अधिकारी, गट-ब (अराजपत्रित) सेवाप्रवेश नियम २०१८

(२) राज्य कर निरीक्षक, (विक्रीकर निरीक्षक) गट-ब (अराजपत्रित) सेवाप्रवेश नियम १९९५

(३) पोलीस उप निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित) सेवाप्रवेश नियम १९९५

**७. परीक्षेच्या संधी :-**

**७.१** आयोगामार्फत आयोजित होणाऱ्या विभिन्न स्पर्धा परीक्षांमध्ये भाग घेणाऱ्या उमेदवारांस संधीची कमाल मर्यादा खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आली आहे:-

(१) अराखीव (खुला) उमेदवारांस कमाल सहा संधी उपलब्ध राहतील.

(२) अनुसुचित जमाती व अनुसुचित जाती प्रवर्गातील उमेदवारांस कमाल संधीची मर्यादा लागू राहणार नाही.

(३) खुला (अराखीव)/आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील दिव्यांग व अनाथ उमेदवारांकरीता कमाल नऊ संधी उपलब्ध राहतील.

(४) उर्वरित मागासवर्ग प्रवर्गातील उमेदवारांस कमाल नऊ संधी उपलब्ध राहतील.

**७.२** उमेदवारांची संधीची संख्या खाली नमूद केल्यानुसार लागू राहतील:

( १) उमेदवाराने पूर्व परीक्षेत भाग घेतल्यास, ही संबंधित स्पर्धा परीक्षेची संधी समजली जाईल.

(२) उमेदवार कोणत्याही कारणास्तव परीक्षेच्या कोणत्याही टप्प्यावर अपात्र ठरल्यास किंवा त्याची उमेदवारी रद्द झाल्यास तरीही त्याची परीक्षेस उपस्थिती संधी गणली जाईल.

(३) प्रत्येक परीक्षेसाठी संधीची गणना स्वतंत्रपणे करण्यात येईल.

(४) संबंधित संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमातील वयोमर्यादेच्या गणनेसह इतर अटी व शर्तीमध्ये कोणताही बदल नाही.

(५) शासनाकडून संबंधित सामाजिक प्रवर्गाकरीताची विहित केलेल्या उच्च वयोमर्यादेपर्यंतच उमेदवारास त्यांना देय असलेल्या संधीचा फायदा घेता येईल.

**८. नकारात्मक गुणांसदंर्भात कार्यपद्धती (Negative Marking) :-**

**८.१** प्रत्येक चुकीच्या उत्तराकरीता २५% किंवा १/४ एवढे गुण एकुण गुणांमधून वजा करण्यात येतील.

**८.२** एखाद्या प्रश्नाची एकापेक्षा अधिक उत्तरे दिली असल्यास अशा प्रश्नाचे उत्तर चुकीचे समजण्यात येऊन त्या प्रश्नाच्या उत्तराकरीता २५ % किंवा १/४ एवढे गुण एकूण गुणांमधून वजा करण्यात येतील.

**८.३** वरीलप्रमाणे कार्यपद्धतीचा अवलंब करताना एकूण अंतिम गुणांची बेरीज अपूर्णांकात आली तरीही ती अपूर्णांकातच गणण्यात येईल व पुढील कार्यवाही त्याच्या आधारे करण्यात येईल.

**८.४** एखाद्या प्रश्नाचे उत्तर अनुत्तरित असेल तर, अशा प्रकरणी नकारात्मक गुणांची पध्दत लागू असणार नाही.

**९. परीक्षेचे टप्पे –**

**९.१ लेखी परीक्षा :-**

**९.१.१** प्रस्तुत भरती प्रक्रिया खालील टप्प्यामध्ये राबविण्यात येईल :-

| अ.क्र. | संवर्ग | टप्पे | संयुक्त पूर्व परीक्षेचे गुण | मुख्य परीक्षेचे गुण | शारीरिक चाचणीचे गुण | मुलाखतीचे गुण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | सहायक कक्ष अधिकारी | संयुक्त पूर्व परीक्षा व स्वतंत्र मुख्य परीक्षा | १०० | ४०० | -- | -- |
| २ | राज्य कर निरीक्षक | | | ४०० | -- | -- |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | संयुक्त पूर्व परीक्षा, स्वतंत्र मुख्य परीक्षा, शारीरिक चाचणी व मुलाखत | | ४०० | १०० | ४० |

**९.१.२** प्रत्येक संवर्ग/पदाकरीता विहित करण्यात आलेल्या परीक्षा योजना व अभ्यासक्रमानुसार स्वतंत्र मुख्य परीक्षा घेण्यात येईल. याबाबतचा सविस्तर तपशील आयोगाच्या संकेतस्थळावरील "**स्पर्धा परीक्षा**" अंतर्गत "**परीक्षा योजना**" विभागातील "**महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब परीक्षेची परीक्षा योजना**" मध्ये उपलब्ध करुन दिला आहे.

**९.२. मुख्य परीक्षेस प्रवेश :-**

**९.२.१** महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब पूर्व परीक्षा - २०२१ च्या निकालाच्या आधारे संबंधित संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या आणि पूर्व परीक्षेच्या जाहिरातीमध्ये नमूद शैक्षणिक अर्हता व अन्य अटींची विहित दिनांकास किंवा त्यापूर्वी पुर्तता करणा-या उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येईल.

**९.२.२** संबंधित संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र उमेदवाराने आयोगाकडून निश्चित करण्यात आलेल्या कालावधीत आयोगाच्या https://mpsconline.gov.in या संकेतस्थळाव्दारे फक्त ऑनलाईन पध्दतीने आवश्यक अर्ज/माहिती सादर करणे आवश्यक राहील.

**९.२.३** पूर्व परीक्षेकरीता आयोगास अर्जाद्वारे सादर केलेल्या माहितीच्या आधारेच प्रस्तुत मुख्य परीक्षेकरीता आवश्यक अर्ज/माहिती ऑनलाईन पध्दतीने सादर करता येईल.

**९.२.४** एकापेक्षा अधिक संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारास प्रत्येक संवर्ग/पदासाठी स्वतंत्रपणे अर्ज सादर करुन प्रत्येक संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेसाठी स्वतंत्र विहित परीक्षा शुल्क भरावे लागेल.

**१०. मुख्य परीक्षेचा निकाल :-**

**१०.१ संयुक्त पेपर क्रमांक-१ तसेच प्रत्येक संवर्ग/ पदाकरीता स्वतंत्रपणे घेण्यात येणाऱ्या पेपर क्रमांक-२ चे गुण एकत्रित करून प्रत्येक परीक्षेची निकाल प्रक्रिया स्वतंत्रपणे राबविण्यात येईल.**

**१०.२** पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता भरावयाच्या एकूण पदांपैकी प्रत्येक आरक्षित प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी सुमारे ४ पट उमेदवार शारीरिक चाचणीसाठी उपलब्ध होतील,अशा रितीने गुणांची किमान सीमारेषा (Cut Off Line) निश्चित करण्यात येईल.

**१०.३** गुणांची सीमारेषा सर्व उमेदवारांसाठी एकच किंवा प्रत्येक सामाजिक प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी तसेच महिला, दिव्यांग, खेळाडू व अनाथ इत्यादीं आरक्षित प्रकारासाठी वेगवेगळी असेल.

**१०.४** प्रत्येक प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी आयोगाने निश्चित केलेल्या सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांना त्यांनी अर्जामध्ये दिलेल्या माहितीच्या आधारे ते विहित अटींची पूर्तता करतात, असे समजून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात शारीरिक चाचणीसाठी (फक्त पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता ) पात्र समजण्यात येईल.

**१०.५** शारीरिक चाचणीकरीता पात्र ठरलेल्या प्रत्येक उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलद्वारे आणि मोबाईल क्रमांकावर लघुसंदेश द्वारे वैयक्तिकरित्या कळविण्यात येईल. तथापि, वैयक्तिकरित्या लघुसंदेशाद्वारे कळविण्याची सुविधा ही अतिरिक्त सुविधा असून आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेला निकाल हाच अधिकृत मानण्यात येईल.

**१०.६** अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र असलेल्या विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती (ब), विशेष मागास प्रवर्ग, भटक्या जमाती (क), भटक्या जमाती (ड), व इतर मागास वर्ग या प्रवर्गातील उमेदवार तसेच महिला व पात्र खेळाडू उमेदवार लेखी परीक्षेत केवळ त्यांच्यासाठी विहित केलेल्या निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त झाल्यास अंतिम शिफारशींच्या वेळी त्यांची उमेदवारी केवळ त्या त्या संबंधित प्रवर्गासाठी विचारात घेतली जाईल. निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची उमेदवारी अराखीव (खुला) पदावरील निवड/शिफारसीसाठी पदासाठी विचारात घेतली जाणार नाही.

**११. शारीरिक चाचणी :-**

**११.१** फक्त पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता शारीरिक चाचणी घेण्यात येईल.

**११.२** लेखी परीक्षेत आयोगाने निश्चित केलेल्या सीमांकन रेषेएवढे किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांना शारीरिक चाचणीसाठी बोलविण्यात येईल.

**११.३** उंची व छातीविषयक विहित मोजमापाच्या अटी पूर्ण करणा-या उमेदवारांचीच शारीरिक चाचणी घेण्यात येईल. सदर चाचणी पुरुष व महिलांसाठी स्वतंत्र असेल.

**११.४** शारीरिक चाचणीच्या वेळी उंची व छातीविषयक विहित मोजमापाच्या अटी पूर्ण न करणा-या उमेदवारांची उंची / छाती मापनाविषयी काही तक्रार असल्यास त्यांनी त्याच दिवशी आयोगाकडे आपला तक्रार अर्ज सादर करणे आवश्यक आहे. याबाबत योग्य तो विचारविनिमय करुन अपात्र उमेदवारांच्या उंची / छातीचे फेरमापन घेण्याकरिता उमेदवारांना स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

**११.५** आयोगाच्या वेळापत्रकानुसार अशा उमेदवारांच्या उंची व छातीविषयक फेरमोजमापनाकरिता दिनांक, वेळ व ठिकाण निश्चित करण्यात येईल.

**११.६** फेरमापनाच्या अनुषंगाने पात्र ठरणा-या उमेदवारांची शारीरिक चाचणी त्याच दिवशी घेण्यात येईल. तसेच शारीरिक चाचणीत पात्र ठरणा-या उमेदवारांची मुलाखत त्याच दिवशी अथवा स्वतंत्रपणे घेण्यात येईल.

**११.७** शारीरिक चाचणी एकूण १०० गुणांची असेल.

**११.८** शारीरिक चाचणीचे गुण अर्हताकारी (Qualifying) असून शारीरिक चाचणीमध्ये उत्तीर्ण होण्यासाठी एकूण गुणांपैकी किमान ६० टक्के गुण(म्हणजेच ६० गुण) मुलाखतीस पात्र होण्यासाठी आवश्यक राहतील. तसेच या गुणांचा अंतिम गुणवत्तेकरीता/अंतिम निवडीकरीता विचार होणार नाही.

**११.९** सर्व शारीरिक चाचणीतील एकूण गुणांची बेरीज अपूर्णांकात असल्यास ती अपूर्णांकातच ठेवून, शारीरिक चाचणीचा निकाल तयार करण्यात येईल.

**११.१०** वरीलप्रमाणे लेखी परीक्षेच्या निकालाआधारे पात्र ठरणा-या उमेदवारांना शारीरिक चाचणीसाठी आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व विहित दिनांकास स्वखर्चाने उपस्थित रहावे लागेल.

**११.११ शारीरिक चाचणीचा तपशील :-**

| पुरुषांसाठी | महिलांसाठी |
|---|---|
| (१) गोळाफेक-वजन-७.२६० कि.ग्रॅ. - कमाल गुण - १५ | (१) गोळाफेक-वजन-४ कि.ग्रॅ.- कमाल गुण - २० |
| (२) पुल अप्स - कमाल गुण - २० | (२) धावणे (४०० मीटर्स ) - कमाल गुण - ५० |
| (३) लांब उडी - कमाल गुण - १५ | (३) लांब उडी - कमाल गुण - ३० |
| (४) धावणे (८०० मीटर ) - कमाल गुण - ५० | |

**११.१२** शारीरिक चाचणीच्या सरावासाठी उमेदवार राज्यातील पोलीस कवायत मैदानांचा उपयोग करू शकतील आणि पोलीस मुख्यालयातील पोलीस उपायुक्तांच्या, तसेच पोलीस अधिक्षकांच्या परवानगीने निदेशकांची मदत घेऊ शकतील.

**११.१३** शारीरिक चाचणीमध्ये किमान ६० टक्के गुण मिळविणा-या उमेदवारांची मुलाखत आयोगाने निश्चित केलेल्या दिनांकास व विहित ठिकाणी घेण्यात येईल. त्याकरिता उमेदवारास स्वखर्चाने उपस्थित रहावे लागेल.

**१२. मुलाखत :-**

**१२.१** फक्त पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता मुलाखत घेण्यात येईल. मुलाखत **४०** गुणांची असेल.

**१२.२** शारीरीक चाचणीच्या निकालाच्या आधारे मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच मुलाखतीसाठी बोलाविण्यात येईल.

**१२.३** मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/अधिसूचनेतील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे तपासली जाईल आणि अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्र सादर करणा-या उमेदवारांची मुलाखत घेतली जाईल.

**१२.४** पात्रतेच्या अनुषंगाने विहित कागदपत्रे सादर करू न शकणा-या उमेदवारांची उमेदवारी रद्द करण्यात येईल व त्याची मुलाखत घेतली जाणार नाही. तसेच त्याकरिता कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही.

**१३. निकाल :-**

**१३.१** पोलीस उपनिरीक्षक संवर्गाच्या निवडीकरीता संबंधित मुख्य परीक्षा (संयुक्त पेपर क्रमांक-१ व स्वतंत्र पेपर क्रमांक-२) आणि मुलाखतीमध्ये प्राप्त केलेल्या गुणांची एकत्रित बेरीज करुन गुणवत्ताक्रमानुसार यादी तयार करण्यात येईल.

**१३.२** सहायक कक्ष अधिकारी तसेच राज्य कर निरीक्षक पदावरील/निवडीकरीता संबंधित मुख्य परीक्षेमध्ये (संयुक्त पेपर क्रमांक-१ व स्वतंत्र पेपर क्रमांक-२) प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे गुणवत्ताक्रमानुसार यादी (Merit List) तयार करण्यात येईल.

**१३.३** गुणवत्ता यादीमधील समान गुण धारण करणा-या उमेदवारांचा प्राधान्यक्रम (Ranking) **"उमेदवारांना सर्वसाधारण सूचना"** मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार ठरविण्यात येईल.

**१३.४** सहायक कक्ष अधिकारी तसेच राज्य कर निरीक्षक पदाच्या लेखी परीक्षेमधून पात्र होण्याकरीता शतमत (**Percentile**) पध्दत लागू आहे.

**१३.५** पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता लेखी परीक्षेमधून शारीरिक चाचणीसाठी पात्र होण्याकरीता शतमत (**Percentile**) पध्दत लागू आहे.

**१३.६** प्रस्तुत परीक्षेमध्ये सर्वाधिक गुण मिळविणा-या उमेदवारांच्या एकूण गुणांच्या खालीलप्रमाणे किमान गुण प्राप्त करणारे उमेदवार शिफारशीसाठी तसेच शारीरिक चाचणीसाठी पात्र असतील :-

**(१) अमागास - किमान ३५ शतमत**

**(२) मागासवर्गीय - किमान ३० शतमत**

**(३) दिव्यांग - किमान २० शतमत**

**(४) अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू - किमान २० शतमत**

**(५) अनाथ - किमान ३० शतमत**

**१४. भरती प्रक्रियेतून बाहेर पडणे(Opting out option) :-**

**१४.१** प्रत्येक संवर्गाच्या अंतिम शिफारशीपूर्वी प्रसिद्ध करण्यात आलेल्या सर्वसाधारण गुणवत्ता यादीच्या आधारे " भरती प्रक्रियेतून बाहेर पडणे (Opting Out) " हा पर्याय आयोगाच्या ऑनलाईन अर्ज प्रणालीद्वारे उपलब्ध करून देण्यात येईल.

**१४.२** " भरतीप्रक्रियेतून बाहेर पडणे " पर्याय सादर करण्यासाठी सर्वसाधारण गुणवत्ता यादीच्या प्रसिद्धीच्या दिनांकापासून ७ दिवसांचा कालावधी देण्यात येईल.

**१४.३** आयोगाच्या ऑनलाईन अर्ज प्रणालीद्वारे प्राप्त " भरतीप्रक्रियेतून बाहेर पडणे " हा पर्याय लक्षात घेऊन अंतिम शिफारस यादी तयार करण्यात येईल.

**१४.४** पदभरतीकरीता भरतीप्रक्रियेतून बाहेर पडणे याबाबतची कार्यवाही फक्त आयोगाच्या ऑनलाईन अर्ज प्रणालीद्वारे विहित कालावधीमध्ये करणे अनिवार्य आहे. यासंदर्भातील इतर कोणत्याही पद्धतीने केलेल्या तसेच नंतरच्या टप्प्यावर पर्याय रद्द करण्यासंदर्भात केलेल्या विनंतीचा विचार केला जाणार नाही.

**१५. शिफारस :-**

**१५.१** **"उमेदवारांना सर्वसाधारण सूचना "** मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार तसेच भरतीप्रक्रियेतून बाहेर पडण्यासंदर्भात उमेदवारांनी दिलेले पर्याय विचारात घेऊन अंतिम शिफारस यादी तयार करून संबंधित विभागाकडे पाठविण्यात येईल.

**१५.२** दिव्यांग अथवा अनाथ अथवा अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू या प्रवर्गाच्या किमान सीमारेषेच्या आधारे शिफारशीसाठी पात्र ठरणा-या उमेदवारास कोणतीही एक सवलत घेता येईल.

**१५.३** शिफारसपात्र उमेदवारांची नावे आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येतील.

**१५.४** शिफारशीनंतर नियुक्तीसाठी शासनाकडे शिफारस करण्यात आली आहे किंवा नाही, याबाबत उमेदवारांच्या प्रोफाईलद्वारे कळविण्यात येईल

**१६. प्रमाणपत्र पडताळणी :-**

**१६.१** सहायक कक्ष अधिकारी तसेच राज्य कर निरीक्षक संवर्गाच्या संबंधित लेखी परीक्षेच्या निकालाच्या आधारे शिफारस पात्र ठरलेल्या उमेदवारांना प्रमाणपत्र पडताळणीसाठी सक्षम प्राधिका-यांकडून बोलविण्यात येईल.

**१६.२** आयोगाने निश्चित केलेल्या किमान सीमारेषेनुसार शिफारस पात्र ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/ शासन परिपत्रकातील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे सक्षम प्राधिका-यांकडून तपासली जाईल.

**१६.३** अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्र सादर करणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी केली जाईल.

**१६.४** पात्रतेच्या अनुषंगाने विहित कागदपत्रे सादर करू न शकणा-या उमेदवारांची शिफारस रद्द करण्यात येईल. तसेच त्याकरीता कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही.

**१६.५** वरीलप्रमाणे लेखी परीक्षेच्या निकालाच्या आधारे शिफारस पात्र ठरलेल्या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी सक्षम प्राधिका-यांकडून निश्चित करण्यात आलेल्या कार्यक्रमानुसार तसेच सक्षम प्राधिका-याने निश्चित केलेल्या ठिकाणी व विहित वेळेस घेण्यात येतील. त्याकरीता उमेदवारास स्वखर्चाने उपस्थित रहावे लागेल.

**१६.६** अर्जातील दाव्यानुसार सक्षम प्राधिका-याकडून करण्यात आलेल्या प्रमाणपत्र पडताळणीच्या आधारे पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच नियुक्ती देण्याची कार्यवाही सक्षम प्राधिका-यांकडून करण्यात येईल.

**१७ मुख्य परीक्षेकरीता अर्ज करण्याची पध्दत :-**

**१७.१ अर्ज सादर करण्याचे टप्पे :-**

**(एक)** आवश्यक असल्यास शैक्षणिक अर्हतेबाबत खाते अद्ययावत करणे. पूर्व परीक्षेच्या अर्जामध्ये नमूद केलेल्या शैक्षणिक अर्हतेव्यतिरिक्त इतर कोणत्याही माहिती /दाव्यामध्ये बदल करता येणार नाही.

**(दोन)** विहित कालावधीत तसेच विहित पध्दतीने खालीलप्रमाणे लागू असेल त्याप्रमाणे आवश्यक कागदपत्रे अपलोड करुन अर्ज सादर करणे .

**(तीन)** परीक्षा शुल्काचा भरणा विहित पध्दतीने करणे.

**(चार)** जिल्हा केंद्र निवड करणे.

**१७.२ विहित कागदपत्रे/प्रमाणपत्रे अपलोड करणे :-**

**(एक)** प्रोफाईलद्वारे केलेल्या विविध दाव्यांच्या अनुषंगाने उमेदवारांची पात्रता आजमावल्यानंतर (Check eligibility) उमेदवार जाहिरातीनुसार पात्र ठरत असल्यास अर्ज सादर करताना खालील कागदपत्रे/प्रमाणपत्रे (लागूअसलेली) अपलोड करणे अनिवार्य आहे :-

| अ. क्र. | प्रमाणपत्र/कागदपत्र | फाईल फॉर्मेट | किमान फाईल साइज (KB) | कमाल फाईल साईज (KB) |
|---|---|---|---|---|
| १ | एस.एस.सी. अथवा तत्सम शैक्षणिक अर्हता | PDF | ५० | ५०० |
| २ | वयाचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| ३ | शैक्षणिक अर्हता इत्यादीचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| ४ | सामाजिकदृष्टया मागासवर्गीय असल्याबाबतचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| ५ | आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील असल्याबाबतचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| ६ | नॉन-क्रिमीलेयर प्रमाणपत्र | PDF | ५० | ५०० |
| ७ | पात्र दिव्यांग व्यक्ती असल्याचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| ८ | पात्र माजी सैनिक असल्याचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| ९ | खेळाडूसाठीच्या आरक्षणाकरीता पात्र असल्याचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| १० | अनाथ आरक्षणासाठी पात्र असल्याचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| ११ | अराखीव महिला, खेळाडू, दिव्यांग, माजी सैनिक, अनाथ आरक्षणाचा दावा असल्यास अधिवास प्रमाणपत्र | PDF | ५० | ५०० |
| १२ | विवाहित स्त्रियांच्या नावात बदल झाल्याचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| १३ | मराठी भाषेचे ज्ञान असल्याचा पुरावा | PDF | ५० | ५०० |
| १४ | लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन | PDF | ५० | ५०० |

**(दोन)** उपरोक्त प्रमाणपत्र/कागदपत्रे आयोगाच्या संकेतस्थळावरील 'उमेदवारांना सर्वसाधारण सूचना' प्रकरण क्रमांक चार तसेच प्रस्तुत अधिसूचनेमध्ये नमूद केल्याप्रमाणे असणे अनिवार्य आहे.

**(तीन)** संबंधित जाहिरातीस अनुसरुन विहित निकष/पात्रता तसेच प्रोफाईलमधील दाव्यांच्या अनुषंगाने प्रमाणपत्रे/कागदपत्रे अपलोड करावी लागतील. प्रोफाईलमधील विविध दाव्यांच्या अनुषंगाने अपलोड करावयाची संबधित कागदपत्रे प्रणालीद्वारे अर्ज सादर करताना प्रदर्शित होतील.

**(चार)** पात्रतेसंदर्भातील विविध दाव्यांच्या अनुषंगाने प्रमाणपत्रे/कागदपत्रे अपलोड केल्याशिवाय अर्ज सादर करता येणार नाही.

**१७.३ सर्वसाधारण :-**

**(एक)** अर्ज फक्त आयोगाच्या ऑनलाईन अर्ज प्रणालीद्वारे स्वीकारण्यात येतील.

**(दोन)** अर्ज सादर करण्याकरीता संकेतस्थळ :- https://mpsconline.gov.in

**(तीन)** अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mpsconline.gov.in तसेच https://mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

**१७.४ अर्ज सादर करण्याचा कालावधी** :-**दिनांक ०३ जून,२०२२ रोजी १४.०० वाजल्यापासून दिनांक १७ जून, २०२२ रोजी २३.५९ वाजेपर्यंत.**

**१७.५ जिल्हा केंद्र निवड :-**

**(एक)**अर्ज सादर करतानाच जिल्हा केंद्राची निवड करणे आवश्यक आहे.

**(दोन)**जिल्हा केंद्र बदलाबाबतची विनंती कोणत्याही परिस्थितीत अथवा कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही

**(तीन)**एखादे जिल्हा केंद्र कार्यान्वित होऊ शकले नाही अथवा एखाद्या जिल्हा केंद्रांवर उमेदवारांना प्रवेश देण्याची क्षमता ओलांडली गेली तर ते जिल्हाकेंद्र निवडलेल्या उमेदवारांची बैठक व्यवस्था जवळच्या दुस-या जिल्हा केंद्रावर करण्यात येईल.

**(चार)**एकदा निवडलेल्या जिल्हा केंद्रामध्ये अथवा आयोगाने निश्चित केलेल्या परीक्षा उपकेंद्रामध्ये बदल करण्याची विनंती कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही.

**(पाच)**वरीलप्रमाणे जिल्हा केंद्रनिवडीची प्रक्रिया पूर्ण न केल्यास उमेदवाराने अर्जामध्ये दिलेल्या कायमस्वरुपी रहिवासाच्या पत्त्याच्याआधारे संबंधित महसुली मुख्यालयाच्या जिल्हाकेंद्रावर किंवा नजिकच्या जिल्हाकेंद्रावर प्रवेश देण्यात येईल. याबाबत आयोगाचे त्या त्या वेळचे धोरण व आयोगाचा निर्णय अंतिम मानण्यात येईल.

**१७.६ परीक्षा शुल्काचा भरणा:-**

**१७.६.१ परीक्षा शुल्क (रुपये) :-**

**(एक)** अमागास - **रु. ५४४/-**

**(दोन)** मागासवर्गीय/आ.दु.घ./अनाथ - **रु. ३४४/-**

**(तीन)** उपरोक्त परीक्षा शुल्काव्यतिरिक्त बँक चार्जेस तसेच त्यावरील देय कर अतिरिक्त असतील.

**(चार)** परीक्षा शुल्क ना-परतावा (Non-refundable) आहे.

**१७.६.२** अर्ज सादरीकरणाचे टप्पे पूर्ण झाल्यावर उपलब्ध होणाऱ्या 'Submit and Pay fees' या बटनवर क्लिक केल्यानंतर किंवा मुख पृष्ठावरील 'माझे खाते' या सदराखालील अर्ज केलेल्या पदांच्या यादीतील 'Fees not Paid' अशी सद्यस्थिती लिहिलेल्या जाहिरात/पद/परीक्षेसमोरील ' Pay Now' या लिंकवर क्लिक करुन परीक्षा शुल्काचा भरणा करता येईल.

**१७.६.३** परीक्षा शुल्काचा भरणा खालील दोन पध्दतीने करता येईल:-

(एक) **ऑनलाईन पध्दतीने :-**

(१) भारतीय स्टेट बँक तसेच क्विकवॉलेट यापैकी कोणत्याही एका पेमेंट गेटवेच्या माध्यमातून क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगद्वारे परीक्षा शुल्क अदा करता येईल.

(२) परीक्षा शुल्काचा भरणा करताना बँक खात्यामधून परीक्षा शुल्काच्या रकमेची वजावट झाल्यावर परीक्षा शुल्काचा भरणा यशस्वीपणे झाला (Payment Successful) असल्याचा संदेश आयोगाच्या ऑनलाईन अर्जप्रणालीच्या पृष्ठावर प्रदर्शित झाल्याशिवाय व परीक्षा शुल्काची पावती तयार झाल्याशिवाय संकेतस्थळावरील संबंधित पृष्ठावरून आणि/अथवा खात्यातून लॉगआऊट होऊ नये.

(३) परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा यशस्वी झाला आहे किंवा कसे, याची स्थिती (status)लगेचच अवगत होईल. खात्यातून Logout होण्यापूर्वी परीक्षा शुल्क यशस्वीपणे भरले असल्याबाबत व बँकेकडून व्यवहार (Transaction) पूर्ण झाला असल्याबाबत खात्री करण्याची जबाबदारी उमेदवाराची आहे.

(४) कोणत्याही कारणामुळे विहित कालावधीत ऑनलाईन पद्धतीने परीक्षा शुल्काचा भरणा यशस्वीपणे करणे शक्य न झाल्यास अर्ज करण्याच्या अंतिम दिनांकानंतर दोन दिवसापर्यंत परीक्षाशुल्काचा भरणा ऑफलाईन पद्धतीने करण्याकरीता चलनाची प्रत घेता येईल.

(दोन) **ऑफलाईन पध्दतीने :-**चलनाद्वारे

चलनाद्वारे परीक्षा शुल्काचा भरणा करण्याचा विकल्प निवडल्यास उपलब्ध होणारी चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत बँकेच्या कार्यालयीन वेळेत विहित अंतिम दिनांकापूर्वी परीक्षा शुल्काचा भरणा करता येईल. तथापि, चलनाची प्रत घेणे व बँकेत शुल्क जमा करणे, यामध्ये किमान तीन तासांचे कालावधी राहील, याची दक्षता घ्यावी.

**१७.६.४** परीक्षा शुल्काचा भरणा यशस्वी न झाल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याबाबतची कार्यवाही प्रस्तुत जाहिरातीच्या/अधिसूचनेच्या अनुषंगाने विहित दिनांकापूर्वीच करणे आवश्यक आहे. कोणत्याही कारणास्तव व्यवहार अयशस्वी ठरल्यास यासंदर्भातील तक्रारीची आयोगाकडून दखल घेतली जाणार नाही.

**१७.६.५** विहित मुदतीत परीक्षा शुल्काचा भरणा करु न शकलेल्या उमेदवारांचा संबंधित भरतीप्रक्रियेकरीता विचार केला जाणार नाही. यासंदर्भात आयोगाच्या संकेतस्थळावरील उमेदवारांना सर्वसाधारण सूचनांमधील संबंधित तरतुदींचे अवलोकन करणे उमेदवारांच्या हिताचे राहील.

**१७.६.६** परीक्षा शुल्काचा भरणा करण्यासंदर्भातील कार्यवाही खालील विहित दिनांकापूर्वी पूर्ण करावी:-

**(एक)** ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्क भरण्याकरीता विहित अंतिम **दिनांक १७ जून, २०२२ रोजी २३:५९** वाजेपर्यंत.

**(दोन)** भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेणे याकरीता विहित अंतिम **दिनांक १९ जून, २०२२ रोजी २३.५९ वाजेपर्यंत.**

**(तीन)** चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये शुल्क भरण्याचा अंतिम **दिनांक २० जून, २०२२** - बँकेच्या कार्यालयीन वेळेत.

**१८. प्रवेशप्रमाणपत्र :-**

**१८.१** परीक्षेस प्रवेश दिलेल्या उमेदवारांची प्रवेशप्रमाणपत्रे आयोगाच्या ऑनलाईन अर्जप्रणालीच्या संकेतस्थळावर (https://mpsconline.gov.in)उमेदवारांच्या प्रोफाईलद्वारे परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे **७** दिवस अगोदर उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

**१८.२** परीक्षेच्या वेळी उमेदवाराने स्वत:चे प्रवेशप्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१८.३** प्रवेश प्रमाणपत्र उपलब्ध करून देण्यात आल्यानंतर उमेदवाराला त्याच्या आयोगाकडील नोंदणीकृत मोबाईल क्रमांकावर लघुसंदेशाद्वारे कळविण्यात येईल. याबाबतची घोषणा आयोगाच्या संकेतस्थळावर परीक्षेपूर्वी एक सप्ताह अगोदर प्रसिद्ध करण्यात येईल.

**१८.४** परीक्षेच्या दिनांकापूर्वी ३ दिवस अगोदर प्रवेश प्रमाणपत्र प्राप्त न झाल्यास अर्ज सादर केल्याच्या आवश्यक पुराव्यासह आयोगाच्या कार्यालयाकडे संपर्क साधावा.

**१८.५** परीक्षेच्यावेळी स्वत:च्या ओळखीच्या पुराव्यासाठी स्वत:चे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा फक्त स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान कोणतेही **एक मूळ ओळखपत्र** तसेच मूळ ओळखपत्राची छायांकित प्रत सोबत आणणे अनिवार्य आहे.

**१८.६** आधार कार्डच्या ऐवजी भारतीय विशिष्ट ओळख प्राधिकरण (UIDAI) च्या संकेतस्थळावरुन डाऊनलोड केलेले ई-आधार सादर करणा-या उमेदवारांच्या बाबतीत ई-आधार वर उमेदवाराचे नाव, पत्ता, लिंग, फोटो, जन्मदिनांक या तपशीलासह आधार निर्मितीचा दिनांक (Date of Aadhaar generation) व आधार डाऊनलोड केल्याचा दिनांक असल्यासच तसेच सुस्पष्ट फोटोसह **रंगीत प्रिंट** मध्ये आधार डाऊनलोड केले असल्यासच ई-आधार वैध मानण्यात येईल.

**१८.७** नावांमध्ये बदल केलेला असल्यास विवाह निबंधक यांनी दिलेला दाखला (विवाहित स्त्रियांच्या बाबतीत), नावांत बदल झाल्यासंबंधी अधिसूचित केलेले राजपत्र किंवा राजपत्रित अधिकारी यांच्याकडून नावांत बदल झाल्यासंबंधीचा दाखला व त्याची छायांकित प्रत परीक्षेच्यावेळी सादर करणे आवश्यक आहे.

**१९. सेवाप्रवेशोत्तर शर्ती :-**

नियुक्त झालेल्या व्यक्तीस खालील परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील :-

**(एक)** जेथे प्रचलित नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा विहित केली असेल अथवा आवश्यक असेल तेथे त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा

**(दोन)** हिंदी आणि मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर ती व्यक्ती अगोदर परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा.

**(तीन)** महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळणीबाबतची प्रमाणपत्र परीक्षा.

**२०.** प्रस्तुत अधिसूचनेमध्ये परीक्षेसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज स्वीकारण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क, निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया, परीक्षा योजना, अभ्यासक्रम इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या https://mpsc.gov.in या संकेतस्थळावरील '**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना** ' तसेच " **परीक्षा योजना** " विभागातील ‘ **महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब पूर्व व मुख्य परीक्षा** ' मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व अधिसूचना अधिकृत समजण्यात येईल.

**२१.** सदर अधिसूचना आयोगाच्या https://mpsc.gov.in तसेच https://mpsconline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

ठिकाण : मुंबई.
**दिनांक : ०२ जून, २०२२**

सह सचिव, जाहिरात
महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

(१) आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात, तसेच, शारीरिक चाचणी व मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन, अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक साधने आणण्यास व वापरण्यास सक्त मनाई आहे. **(२)** प्रमाणपत्र तपासणीच्या वेळी पात्रतेसंदर्भातील सर्व मूळ प्रमाणपत्रे सादर न केल्यास शिफारस/नियुक्तीसाठी विचार करण्यात येणार नाही.